# जलतरंग

( लघुकथा संग्रह )



: लेखक :

विठ्ठल दत्तात्रेय चिन्दरकर



: प्रकाशक :

न्यू भारत प्रिंटिंग प्रेस

६ केळेवाडी, गिरगांव रोड, मुंबई नं. ४



१९३६



किंमत १२ आणे

माझ्यावर अतिशय लोभ करणारे माझे मेहुणे
सुप्रसिद्ध पत्रपंडित, श्री. आप्पाराव ऊर्फ
पु. बा. कुळकर्णी आणि माझी प्रिय
भगिनी सौ. हिराबाई यांना
अत्यंत आदरपूर्वक अर्पण

# कांहीं कोंकणी शब्द

टापरी= चुंबळ.

उक्षी= रानटी झुडुप.

देवबाग<br>मोऱ्याचा धोंडा } = मालवणांतील विशिष्ट स्थळें.

केंबळ= वाळलेलें गवत.

वसाड= धांवती मोठी लाट.

अवदान= फार मोठी फेसाळणारी लाट.

गडगा= तट.

खाडू= नारळीवर चढतांना पायांत अडकवावयाचा दोर.

बोंडा= नारळीचें प्रथमावस्थेंतील फळ.

भोपळी= सकाळचें कोवळें ऊन.

घो= नवरा.

सांबारें= आमटी.

कुबटाची कढी= माशांच्या आंबटीचा फक्त मच्छीमारी लोकांनाच माहित असलेला एक प्रकार.

खका= तुकडा.

डोळी= मेण्यासारखें वाहान.

डोणी= पाणी साठविण्याची विहिरीवरील दगडी कुंडी.

# दीपकिरण

वहिवाटीचा हक्क वाङ्मयांतही असतो असें वाटतें. नाहींतर सात आठ वर्षांपूर्वी कांहीं कविता माझ्याकडे पाठविल्याची आठवण देऊन श्री. चिंदरकरांनीं आपल्या कथासंग्रहाला प्रस्तावना लिहिण्याविषयीं मला सांगितलें नसतें. आठवणी लिंबाच्या लोणच्यासारख्या असतात यांत संशय नाहीं. त्या जितक्या अधिक जुन्या तितकी त्यांची गोडी जास्ती ! चिंदरकरांच्या कवितांच्या शुद्धीकरणाची आठवणही मला त्यामुळेंच रंजक वाटली. मी त्याना त्यावेळीं लिहिलें होतें, " कवितेच्या बाबतींत तुमचा मार्गदर्शक होण्याइतकी माझीच तयारी नाहीं. घरांत आई नसली म्हणजे वडील बहिणीनें धाकटया बहिणीवर अधिकार गाजवावा अशा पैकींच हा प्रकार होण्याचा संभव ! " रक्ताचीं नातीं विसरणाऱ्या जगांत शब्दाचीं नातीं वाऱ्यावर विरून जात असतील अशी माझी कल्पना, पण इतक्या पावसाळ्यानंतरही चिंदरकरांच्या स्मृतींतला एक शब्दही पुसट झाला नाहीं हें पाहून मला आश्चर्य वाटलें. अर्थात् लग्नाच्या वेळीं वडील बहिणीनें पाठराखीण म्हणून आलें पाहिजे असा धाकटया बहिणीनें हट्ट धरल्यावर त्याला नकार तरी कसा द्यायचा ?

मराठी ललितवाङ्मयांत सध्यां लघुकथायुग सुरू आहे. कोणत्याही क्षेत्रांत युग महात्म्य नेहमींच अजिंक्य असतें. समाजाच्या संक्रमणावस्थेपासून धांवपळीच्या जीवनापर्यंत हजारों नव्या गोष्टी लघुकथेच्या निर्मितीला साह्याय्य करीत आहेत. जीवनगंगा सहस्र मुखांनीं भविष्यकाळाला मिळूं पहात आहे. या संगमावरलीं मनोहर विविध दृश्यें लघुकथेखेरीज दुसऱ्या कोणत्या वाङ्मयप्रकारांत यथार्थ रीतीनें प्रतिबिंबित होण्याचा संभव आहे ? कादंबऱ्या—अगदीं मोठया कादंबऱ्यासुद्धां समाजाला नकोत

असें नाहीं. पण पदोपदीं अबोली सुरंगीचे वळेसर माळणाऱ्या कोंकणांतील तरुणीलासुद्धां गुलाबाचें अगर नागचांफ्याचें एकच टपोरें फूल केंसांत खोंवून आरशांत पाहण्यांत आनंद होतोच कीं नाहीं ? शिवाय फुलांच्या वेण्या कांहीं स्वस्त नसतात हेंही या अर्थयुगात ध्यानांत ठेवलेंच पाहिजे.

चिंदरकरांचे ' जलतरंग ' पाहणाराला त्यांतील विविध रंग निःसंशय आकर्षक!वाटतील. ' हृदयदान ' ' देवता ' इत्यादि गोष्टींतली कल्पना रम्यता ''खोटें नाणें ' अगर ' बळी ' यामध्यें मुळींच सापडणार नाहीं. ' कशानें मेली ' या गोष्टींत भूतबाधेविषयींच्या लोकभ्रमावर त्यांनीं झगझगीत प्रकाश पाडला असला तरी ' सावबा ' या गोष्टींत पिशाच्याच्या कल्पनेंतली अद्भुतरम्य छाया चित्रित करतांना त्यांनीं आपला हात मुळींच आंखडता घेतलेला नाहीं. अस्पृश्यतेवर गोष्ट आली नाहीं असा एक आठवडाही सध्यां जात नसेल. पण अतिपरिचयामुळे अवकळा आलेला हा विषय ' विहिरीचा संताप ' या गोष्टींत लेखकानें कल्पक कुशलतेनें मांडला आहे. अद्भुतता, कल्पनारम्यता, सूचकता, वास्तवता असें पार्श्वभूमींत वैचित्र्य असल्यामुळें चिंदरकरांचीं कथाचित्रें केवळ एका ठशांचीं वाटत नाहींत ही आनंदाची गोष्ट होय. कारण तान असो, कोटि असो, प्रसंग असो अगर भाषण असो, पुनरावृत्ति म्हणजेच कला असें मानण्याकडे अनेक कलावंताचा कल दिसून येतो.

वरेरकरांपासून म्हापणकरांपर्यंत अनेक पुरुषांनीं महाराष्ट्राला परिचित केलेली मालवण हीच चिंदरकराची जन्मभूमि आहे. त्यामुळें या कथासंग्रहांतील अनेक गोष्टींतही दक्षिण कोंकणाचें रम्य प्रतिबिंब पडलेलें वाचकांना आढळून येईल. ( पृ. ५१–५२ ) " रात्रीं माडांच्या बागांतून जाणाऱ्या जानकीला मधूनच कोठेंतरी पडणाऱ्या बोंड्याचा ध्वनि ऐकूं येत होता " ( पृ. ९१ ), किंवा "मोहरलेला आंब्याचा मधुर वास

उत्तेजित करीत होता आणि जवळच्या रानांत कोकिळा-कवडे आवाज करीत होतीं.” (पृ. ९५.) असल्या ओळी लेखकाची वातावरणाशीं झालेली समरसता सिद्ध करतात. वसंतकाळाचें पुस्तकी वर्णन करणारानें कोकिळेविषयीं वाटेल तेवढा पाल्हाळ केला असता. पण करुणक्रंदन करणाऱ्या कवड्याची मात्र त्याला मुळींच आठवण झाली नसती! ‘बोंडा’, ‘रवका’ ‘गडगा’, ‘डोळी’, ‘खाडू’ ‘डोणी’ इत्यादि कोंकणविशिष्ट शब्द चिंदरकरांनीं कुशलतेनें वापरले आहेत. प्रत्येक बोलींत वाङ्मय लिहिण्याचा अट्टाहास म्हणजे लहान सहान नद्यांतून गलबतें चालविण्याचें शेख महंमदी मनोराज्यच म्हणायचें. पण लहान लहान नद्या मिळाल्यामुळेंच मोठी नदी निर्माण होते व तिचे कालवे भोंवतालचा भूमिभाग संपन्न करूं शकतात. निरनिराळ्या बोलींतील सुटसुटीत व अर्थवाहक शब्दांनीं ग्रथभाषेचें भांडार असेंच समृद्ध करणें इष्ट नाहीं का? चिंदरकरांनीं कोंकणी शब्द वापरतांना कौतुक करण्याजोगी दक्षता घेतली आहे. पांचदहा परिचयाच्या माणसांबरोबर एखादा अनोळखी मनुष्य आला कीं तो कोण असावा हें आपणाला अंदाजानेंही ताडतां येतें. बोलींतील अपरिचित शब्दांची योजना करतांना चिंदरकरांनीं हें अवधान चांगल्या रीतीनें संभाळलें आहे.

त्यांच्या भाषेंतल्या या वैशिष्ट्याबरोबर एका वैगुण्याचाही उल्लेख केला पाहिजे. मुलाच्या डोळ्यांत काजळ घातल्यावर त्याला दृष्ट लागूं नये म्हणून त्याच काजळांतलें बोट गालावर लावण्याचा मोह आईला होतो. तसाही प्रचार झाला असेल कदाचित्. पण प्रवाह व प्रसाद हे दोन्ही भाषागुण उदयोन्मुख लेखकांत वाढत्या प्रमाणांत दिसत असेल तरी भाषेच्या शुद्धतेकडे त्यांचें अनेकदां दुर्लक्ष झालेलें आढळतें. चिंदरकरही कांहीं या नियमाला अपवाद नाहींत. ‘माझ्यापासून कोणतीही स्त्री सुखी होणार नाहीं.’ असें म्हणण्याऱ्या त्यांच्या प्रो. मेघनादांनीं फार पूर्वीच्या मराठी बायबलाखेरीज दुसरें मातृभाषेंतील पुस्तक वाचलें नसावें असा

एखाद्याला संशय नाहीं का यायचा ? ‘ विचाराच्या गुंगींत रंगून जाणें, ’ ‘ धुंदता ’ ‘ मलूलता ’ ‘ हातांतील साहित्यानें हात दमून गेल्यामुळें,’ ‘ पीतधवल मिश्रित ’ इत्यादि शिथिल प्रयोग सुधारणे कठिण थोडेंच आहे. घराबाहेर जातांना आपण जसें आरशांत डोकावून पाहतों तेवढें आत्मपरीक्षणाचें काम लेखकानें केलें तरी चालण्यासारखें आहे.

हें पुसट गालबोट सोडून दिलें तर चिंदरकरांच्या भाषेचा रंग आकर्षक आहे यांत संशय नाहीं. त्यांची भाषा साधी आहे; पण गबाळ नाहीं. तिच्या चालण्यांत नर्तिकेच्या पदविन्यासाचा भास होत नसला तरी मोहकपणा आहे. ‘ कंकणरव ’ ‘ कंकणध्वनि ’ सारखे कांहीं शब्द सोडून दिले तर श्रोत्यांना ‘ भावांनो आणि बहिणींनो ’ म्हणून संबोधणारे ना. जाधवराव सुद्धां त्यांच्या भाषेविरुद्ध फारशी तक्रार करणार नाहींत. अलंकार ही स्त्रीची काय किंवा भाषेची काय बाह्य शोभा; तो कांहीं आत्मा नव्हे. त्यांतून या शोभेंत थोडेसें कांहीं चुकलें कीं दुसऱ्या अर्थानें शोभा व्हायची पाळी येते. एखाद्या बाणभट्टाला अगर ओ हेन्रीला अलंकारिक अवजड भाषा पेलतां आली तरी तें इतरांचें काम नव्हे. हालाहल शंकरानेंच पचवावें आणि शिवधनुष्य रामानेंच मोडावें. लग्नाकार्यांत उसने दागिने आणून मिरविणाऱ्या स्त्रीची हौस अनेकदां लेखकातही संचारते. या मोहाला बळी पडून सेकंडहँड कोट्याकल्पनांचें दुकान आपल्या कथामंदिरांत चिंदरकरांनीं उघडलेलें नाहीं ही गोष्ट त्यांच्या औचित्यदृष्टीची साक्षच नव्हे का ? असें असूनही त्यांची साधी भाषा वाचकांना पावसाळ्याच्या शेवटीं चिमण्या जांभळ्या फुलांनीं खुलणाऱ्या कोंकणांतल्या हिरवळीसारखी वाटते. खालील वाक्येंच पहानाः—

( १ ) त्यानें विचारलें “ आज काय नवीन बातमी ? ”

" इश् ! बातमी कसली ? वर्तमानपत्राची बातमीदार थोडीच आहे मी ! "

( २ ) इस्पितळ म्हणजे भूलोक आणि मृत्युलोक यांच्यामधील दुवा ! दोन्ही लोकांची त्यावर छटा पसलेली असायची !

( ३ ) पैसा ही सगळ्या गरजांची जननी आहे; गरीबांशीं ती मात्र सावत्र आईसारखी वागते.

( ४ ) तिचें सांत्वन करणारें खोलींत कोणीच नव्हतें. पण नाहीं तरी कसें म्हणावें ? मातीच्या मडक्यांत विहार करणारे उंदीर इकडे तिकडे चुळबुळ करीत होते; झुरळें आपल्या मिशा हलवून तिला सहानुभूति दाखवीत होतीं; कोनांत उभारलेला जाळ्यांतील कोळी एकाग्रतेनें तिच्याकडे पाहत होता; आणि बाजूला पडलेली मळकट गोधडी आपल्यावर झोंप, अशा आविर्भावानें जणुं तिच्याकडे पाहत होती.

( ५ ) काळ्या रात्रीं उमलणारें निशिगंधाचें फूल दिसावें तशी ती हंसली.

( ६ ) झोंप ही स्त्रीजातीची ! स्त्रीची जसजशी आराधना करावी तसतशी ती फुरंगटून बसते आणि तिच्याशीं तुसडेपणानें वागताच ती उलट आपलीच आराधना करावयाला लागते.

ललितवाङ्मय हें जसें जीवनाचें कलात्मक प्रतिबिंब, त्याप्रमाणें ललितवाङ्मयातील भाषा हीहि खऱ्याखुऱ्या बोलण्याच्या भाषेवर कलासौंदर्याचे संस्कार झाल्यावरच निर्माण होते. हे संस्कार करण्याचें सामर्थ्य लेखापाशीं थोडें तरी आहे एवढें वरील वाक्यांवरून सहज दिसून येईल.

लेखनावरून लेखकाच्या आवडीनिवडींचें अनुमान करणें थोडें धोक्याचें असलें तरी बरेंच गंमतीचें असतें. 'हृदयदान' व 'खोटें नाणें' या गोष्टींत हृदयविकारावर औषध शोधून काढणारा प्रोफेसर व

स्वस्त नवीन घडयाळ तयार करणारा घडयाळजी दाखविले आहेत. पहिला शोध नोबेल प्राइझच्या योग्यतेचा असूनही त्याला तें मिळणें शक्य नाहीं व गोष्टींतल्या स्वस्त घडयाळांनीं देशांतले उद्योगधंदे वाढत नाहींत हें खरें. पण लेखकाच्या मनांतल्या आकांक्षा त्यामुळें स्पष्ट दिसतात हें काहीं खोटें नाहीं. घडयाळजी, भाजीवाली, गाबीत वगैरेंचीं चित्रें रेखाटून लेखकानें खालच्या वर्गाशीं समरस होण्याइतकी सहृदयता स्वतःच्या अंगीं वसत आहे हें दाखविलें आहे. ‘ पायातील वहाण ’ या गोष्टींतील पांडूचा मृत्यु थोडासा अतिरंजित असला तरी बुद्धि असून शिकण्याची संधि न मिळणारीं त्याच्यासारखीं मुलें या अभागी देशात लाखांनीं मोजता येतील. खेडयापाडयांत लंगोटी लावून आणि पेजेवर राहून कितीतरी बालरत्नें अक्षरशः मातीमोल होऊन जात आहेत. अशा मुलाचा गळा कितीही गोड असला तरी गुरांना हांका मारण्याखेरीज त्याचा काय उपयोग ? त्याचें वक्तृत्व गांवठी भाडणांतच खर्च व्हायचें आणि त्याच्या शौर्याची सीमा देवाला बळी द्यायचें कोंबडें मारण्यापर्यंतच जायची ! ‘ आणा पैसा, नाहींतर गुंडाळा गाशा ’ हाच जिथें समाज-देवतेचा महामंत्र तिथें तिच्या हाताखालीं राबणाऱ्या सरस्वतीला तरी कुठलें स्वातंत्र्य मिळणार ? ‘ भाजीवाली ’ या गोष्टीचा शेवटही मुख्य पात्राच्या मृत्यूंतच असला तरी सगुणेची सूडाची विकृत कल्पना असंभाव्य वाटत नाहीं. ‘ खोटें नाणें ’ ही गोष्ट व्हावी तितकी परिणामकारक झाली नाहीं. याचें एक कारण तिच्या नावांत सूचकता नाहीं. नायक किसन याच्या गरिबीचें वर्णन वाचतांना गोष्टीच्या नांवावरून तो खोटीं नाणीं पाडूं लागणार हें भविष्य वाचकाला वर्तवितां येतें. सध्यां वर्तमानपत्रांत छापल्या जाणाऱ्या भविष्यांप्रमाणें तें अजीबात खोटें ठरलें असतें तर लेखकानें केलेल्या या फसवणुकींत वाचकाला आनंद वाटला असता. पण तसेंही घडत नाहीं. गोष्टीचें नांव

सूचक असावें हें खरें पण सूचक म्हणजे कथानकावर प्रकाश टाकणारें नव्हे. नावानें कथानकाची दिशा दाखविली तरी त्याचा प्रत्यक्ष मार्ग अंधारांतच राहणें बरें. या गोष्टींत दिसून येणारा एक दोष—उत्कंठा-संवर्धन व परिणामकारक शेवट यांचा अभाव, ‘ स्त्री आणि पुरुष ’ ‘ कशानें मेली ’ वगैरे गोष्टींतही दिसून येतो. कथासूत्र कितीही तोकडें असो, त्याला शेवटीं निसरगाठ बसलीच पाहिजे. ‘ खोटें नाणें ’ ही गोष्ट केवळ तत्वदृष्टया पाहिलें तर फार महत्वाची आहे. राक्षसी गरिबी हीच जगांतील बहुतेक गुन्ह्यांची आई नाहीं का ? खऱ्या नाण्याला महाग झाल्याशिवाय खोट्या नाण्याच्या फंदांत कोण पडणार ? पण तत्व कितीही भव्य अगर सर्वस्पर्शी असलें तरी ललित वाङ्मयांत कलासौंदर्यानें नटल्याशिवाय तें परिणामकारक होत नाहीं. ना कथानकाची रंजकता ना स्वभावाचे चढउतार अशी कथा तत्वप्रधान असली तरी तिचा काय उपयोग ? अमृत वाढण्याच्या वेळीं विष्णूने मोहिनीरूप घेतलें तें उगीच नाहीं. ‘खोटें नाणें’ या गोष्टींतील किसनवर आपल्याहून गरीब असलेल्या मनुष्याला खोटे रुपये देण्याचा प्रसंग येऊन त्यावेळीं होणारी त्याच्या मनाची अनुकंपनीय स्थिति चित्रित झाली असती तर कथानकाला कदाचित् अधिक उठाव मिळाला असता.

दारिद्र्याइतकाच दुसरा भयंकर राक्षस म्हणजे धर्मभोळेपणा ! किंबहुना हे दोन्ही राक्षस जरासंधाच्या देहाप्रमाणें एकरूप झालेले भाग आहेत. ‘ कशानें मेली ’ या गोष्टींत अंजनीला येणाऱ्या झटक्यावर पंचाक्षरी तिला कोंडून मिरचीची धुरी देतो व त्यामुळें ती मरते असें दाखविलें आहे. अडाणी हिंदु बहुजनसमाजाच्या धर्मभोळेपणाची शिडी पृथ्वीवर उभी असून स्वर्गापर्यंत पोंचली आहे. या शिडीच्या पायऱ्यांवर भुतांबरोबर देवही आढळतात. आणि नवसांबरोबर बलीदानही दिसतें. उपनिषदें आणि भगवद्गीता यांतील तत्त्वज्ञानावर पोसलेली संस्कृति ही

खास नव्हे. अज्ञान, दुबळेपणा आत्मविश्वासाचा अभाव, मरतुकडें समाधान इत्यादि सामाजिक दुर्गुणांत पोसणाऱ्या या धर्मभोळेपणाच्या विषाचा नायनाट केल्याशिवाय हिंदुस्थानाची रुग्णावस्था नाहींशीं होणें शक्य नाहीं. या दृष्टीनें चिंदरकरांची 'बळी' ही गोष्टही वाचनीय आहे. आपलें मूल जगावें म्हणून दुसऱ्याचें मूल बळी देण्याची कल्पना किती भयंकर वाटते ! या गोष्टींतली जानकी स्वतःच्या मुलाला बरें वाटावें म्हणून देसायांच्या विजयाला समुद्रांत टाकण्याकरितां नेते. भयभीत झालेला विजय जानकीला घट्ट मिठी मारतो. त्या मिठींतल्या मूक टाहोनें जानकीचें बधिर झालेलें हृदय भानावर येतें. चिंदरकरांनीं हा प्रसंग किती नाजुकपणानें चितारला आहे !

"जानकीच्या कुशींत डोकें खुपसून तो तिला अगदीं घट्ट बिलगला. त्यानें आपल्या बोबड्या बोलांत भीतीनें जानकीला हांक मारली,

"जाङ्की !"

त्या हांकेतील मार्दवानें आणि त्याच्या चिमुकल्या आलिंगनानें जानकीच्या अंगावर सुखकारक रोमांच उभे राहिले. तिचें हृदय वात्सल्यानें भरून आलें. तिनें त्याचें कापसासारखें मऊ मऊ अंग नकळत आपल्या हृदयाशीं अधिकच दाबलें. आणि वात्सल्याच्या भरांत त्याचे पटापट मुके घेतले. आवेगानें त्याला पुन्हां उराशीं धरून एका हातानें त्याला पाठीवर थोपटीत ती उद्गारली, "नाहीं बरं ! माझ्या पाडसाला नाहीं मी मारणार ! जळोत माझे हात !"

या गोष्टींत धर्मभोळेपणाचें भेसूर चित्र रेखाटलें आहे हें खरें पण तिच्यांत नुसते तत्वाचे शुष्क खडक नाहींत. जानकीच्या हृदयांतून वाहणाऱ्या प्रेमाच्या पुरांत ते लोपून गेले आहेत. 'सावबा' या गोष्टींतली कल्पना चंद्रशेखरांच्या 'काय हो चमत्कार' या खंडकाव्यांतल्या सारखी आहे. समुद्रांत बुडालेला सावबा एके रात्रीं येतो,

बायकोला भूक लागली आहे म्हणून सांगतो व जेवल्यावर पहांटेचा कोंबडा आरवतांच अदृश्य होतो. अद्भुताच्या साहाय्यानें केलेला या गोष्टींतील करुणाचा परिपोष ठीक वाटतो. पण ' पूर्वजन्मींचे वैरी ' या गोष्टींत नवऱ्यानें मुंगूस होऊन नागीण झालेल्या बायकोला ठार मारणें नुसतें अस्वाभाविकच नव्हे तर सर्वथैव अशक्य वाटतें. नवराबायकोंचें अहिनकुलसख्य स्वप्नद्वारा दाखविण्यांत थोडी तरी सूचकता आहे. पण त्या स्वप्नांचा प्रत्यक्ष प्रयोग करुणाजनक न होतां हास्यास्पदच वाटतो. त्यापेक्षां या विपरीत स्वप्नांचें पर्यवसान पतिपत्नींचीं मनें एकमेकांविषयीं साशंक होण्यांत झालें एवढें दाखविणें कदाचित् योग्य झालें असतें. अद्भुताची आवड असलेल्या कल्पनेला सूचक अगर प्रतीकात्म कथा लिहाव्याशा वाटणें स्वाभाविकच आहे. क्रिकेटचा शोक असणारांना टेनिस कांहीं परकें वाटत नाहीं. चिंदरकरांनीं ' विहिरीचा संताप ' व ' सूड ' अशा या त्रुटित पद्धतीच्या दोन गोष्टी लिहिल्या आहेत. त्यांत कल्पकतेचा रमणीय विलास नसला तरी व्यंगटीका आहे. पहिल्या गोष्टींतली विहीर स्पृश्यांची अस्पृश्यांविषयींची उदासीनता पाहून आटून गेली असती तर गोष्टीला अधिक रंग भरला असता. कल्पकता व सूचकता यांचे मनोहर मिश्रण करण्याकडे ते लक्ष देतील तर या पद्धतीच्या गोष्टी त्यांना साधतील असें वाटतें.

' हृदयदान ' गोष्टींत उत्कंठतेचा परिपोष बरा आहे; पण शेवट त्या मानानें फिक्का वाटतो. ' देवता ' या गोष्टीची रचना ओ हेन्रीच्या ' Gift of Magi ' या आकर्षक गोष्टीच्या वळणावर गेली असली तरी तिची रंजकता कांहीं कमी वाटत नाहीं. शेवट मात्र सध्यांपेक्षांही सफाईदार हवा होता. ' सुंदर भिकारीण ' हीही या संग्रहांतील वरच्या दर्जाची गोष्ट आहे. तिच्यांतील संयम परिणामकारक वाटतो. ' सहज ' ही भाऊबंदकीच्या विषयावर लिहिलेली गोष्ट असली तरी तिच्यांत

लेखकाचें कौशल्यही दिसून येतें. 'शेवग्याच्या शेंगा' या याच विषयावरील गोष्टीशीं तिची तुलना करून पाहण्याजोगी आहे.

पाण्यामध्यें तरंग दोन तऱ्हांनीं उठतात. बाह्य आघातांनीं किंवा वायुलहरींनीं. या संग्रहांतील कथांचा जन्मही असाच वाटतो. करुण सामाजिक दृश्यांनीं लेखकाच्या हृदयाची होणारी तळमळ व सुंदर कलापूर्ण कल्पनांनीं चालणारें त्याचें नर्तन हीं दोन्हीं जलतरंगांत पहावयाला सांपडतील. भावनांच्या दृष्टीनें 'बळी', 'सहज', 'सुंदर भिकारीण', तंत्रदृष्ट्या 'पायांतील वहाण', 'बळी', 'सूड' आणि रंजकतेच्या दृष्टीनें 'देवता' 'सावत्रा' व 'हृदयदान' या गोष्टी कुणालाही वाचनीय वाटतील. कथालेखनकला ही हिमालयाप्रमाणें गगनचुंबी आहे हें माझ्याप्रमाणें चिंदरकरही जाणतात. या हिमालयाच्या पहिल्या रांगा चढून त्यांनीं काढलेलीं चित्रें वाचकांना आवडल्यास पुढील अवघड प्रवास करायला त्यांना प्रोत्साहन मिळेल हें काय निराळें सांगायला हवें ?

ता. ३१-१२-३५
पुणें.

—वि. स. खांडेकर.

# कि ना ऱ्या व र !



माझ्या गोष्टी वाचकांना आवडतील कीं नाहीं या भीतीनें वाचकांपुढें येण्यास मी भीत होतों; परंतु श्री. खांडेकरांसारख्या सुप्रसिद्ध आणि वडिल साहित्यिक 'भाऊ'ची सोबत मिळाल्यामुळें माझी भीती थोडी तरी कमी झाली आहे. माझी भीती निराधार असल्याचें वाचकांनीं दाखविल्यास मी त्याचा आभारी होईन. 'जलतरंगां'तील विविध तरंगांबद्दल खांडेकरांनीं आपल्या 'दीपकिरणां'त त्यांना स्वतःला काय वाटतें तें स्पष्ट सांगून टाकलेंच आहे. मी स्वतःचें मत प्रदर्शित करणें अप्रासंगिक होईल. वाचकांनीं मात्र आपलें गुणदोषांबद्दलचें प्रामाणिक मत स्पष्टपणें द्यावें. त्याचा उपयोग मला खचीत होईल.

'जलतरंगा'चे प्रकाशक न्यूभारत प्रिंटिंग प्रेसचे चालक श्री. रघुनाथपंत देसाई आणि त्यांचे सहकारी मंडळ यांचा माझा स्नेह या पुस्तकामुळेंच जुळून आला. त्यांनीं मनावर घेतलें नसतें तर पुस्तक इतक्या लवकर आणि अशा सुबक रीतीनें छापून निघणें बरेंच कठीण होतें. त्यांचे आभार मानावे तेवढे थोडेच आहेत.

आजारीपणांतही श्री. वि. स. खांडेकर यांनीं 'दीपकिरण' दाखवून मला कायमचें ऋणि करून ठेविलें आहे. त्यानीं माझ्याविषयीं दाखविलेल्या लोभाबद्दल मी त्यांचा आभारी आहें. त्याप्रमाणें मला लेखनव्यवसायांत आजवर उत्तेजन दिल्याबद्दल गुरुवर्य भाऊसाहेब ऊर्फ श्री. वि. वा. आजगांवकर बी. ए., श्री. पा. ना. मिसाळ, श्री.

पु. बा. कुळकर्णी, श्री. मामा वरेरकर यांचे आणि पुस्तक प्रसिद्ध होईपर्यंत अनेक प्रकारचें सहाय्य केल्याबद्दल श्री. वा. दा. गोखले एम्. ए., 'लोकमान्या'चे संपादक श्री. द. ग. सावरकर, श्री. कृ. न. चौधरी, श्री. वा. रा. ढवळे, श्री. म. ना. पितळे प्रभृति मित्रांचा मी अत्यंत आभारी आहें.

माझे मित्र चित्रकार श्री. वा. ल. धारगळकर यांनीं पुस्तकाचें बाह्यांग सजविण्याचें काम आपल्याकडे हौसेनें घेऊन तें चांगलें पार पाडल्याबद्दल त्यांचेही आभार मानतों.

ता. ३१-१२-३५<br>टोपीवाला बिल्डिंग<br>बरोज लेन, मुंबई नं. २

सर्वांचा नम्र,<br>**वि. द. चिंदरकर**

———

## हृदय-दान



प्रो० मेघनाद त्या शेळीच्या पोराला हृदयाशीं धरून आनंदानें नाचूं लागले. त्यांचा हर्ष त्यांच्या हृदयांत मावेनासा झाला होता. इतके दिवस जो प्रयोग ते करीत होते, ज्याच्या चिंतनांत आणि कृतींत त्यांचा कांहीं काळ गेला तो प्रयोग पूर्ण यशस्वी झाला हें पाहून त्यांचा आनंद असा कारंज्याच्या फवाऱ्यासारखा उसळी मारून बाहेर पडत होता. आपल्या खोलींत ते जवळ जवळ नाचत होते. कोणाला तरी हा आनंद सांगावा आणि आपल्या आनंदाचा भागीदार करावें असें त्यांस वाटूं लागलें.

त्यांच्या डोळ्यापुढें इरावतीची प्रतिमा उभी राहीली. इरावती जर यावेळीं येईल तर काय बहार होईल, अंतःकरण खुलें करायला तीच एक लायक आहे, तिलाच माझ्या अपूर्व शोधानें कौतुक वाटेल, तीच कांहींतरी गोड गोड बोलून माझा उत्साह वाढवील, असें त्यांना वाटलें.

पण क्षणांत इरावतीचा विचार त्यांच्या मनांतून गेला आणि त्या गरीब शेळीच्या पोराकडे त्यांचें लक्ष वेधलें. ते एकदम आवेगानें उद्गारले, " पोरी, तूं किती छान आहेस ! माझ्या शोधाचं सारं श्रेय. तुलाच आहे. " त्यांनीं त्या शेळीच्या पाठीवरील मऊ केंसावरून हळूवार हात फिरविला आणि तिच्या अंगावर आपलें डोकें घासलें.

" छान छान ! चांगली युक्ति सुचली. अस्संच करायचं. तुझा फोटोच काढून ठेवतों. मग लोकांना होऊं द्या या अपूर्व शोधाला कारण झालेल्या शेळीबाईचें दर्शन." कांहीं तरी विचार मनांत घेऊन ते म्हणाले. त्यांनीं आपल्या प्रयोग शाळेंतील कपाटांतून छोटा कॅमेरा काढला. त्या शेळीच्या पोराला व्यवस्थित उभें केलें. आणि कॅमेरा घेऊन फोटो घेणार इतक्यांत दरवाजाबाहेर कोणाच्या तरी चपला वाजल्या आणि एका मिनिटाच्या अवधींत इरावती आंत आली.

" प्रोफेसरसाहेब शेळीचा फोटो घेताहेत वाटतं ?" तिनें आश्चर्यचकीत होऊन् प्रश्न केला.

" हां. इरावति, तुम्हीं आलां, ठीक झालं. माझा प्रयोग आज यशस्वी झाला. म्हणूनच या शेळीचा आतां फोटो घेत होतों. इतक्यांत तुम्हीं आलां."

" मग असं करूं आपण, या शेळीसह तुमचाही फोटो काढूं; मग ठीक होईल. मी घेतें फोटो." इरावतीनें सूचना केली. आणि त्यांच्या उत्तराची वाट न पाहतां तिनें कॅमेरा घेऊन ' रेडी प्लीज ' म्हणून प्रोफेसरांना तयार रहाण्याचा इषाराही दिला.

प्रोफेसरांना इरावतीची कल्पना आवडली आणि ते शेळीच्या शेजारीं जाऊन उभे राहिले. क्षणांत दुसरीच कल्पना त्यांच्या मनांत येऊन पोराला त्यांनीं उचलून घेतलें आणि म्हणाले, " आतां छान जमलें नाहीं ?"

इरावतीनें संमतिदर्शक किंचित् मान हलविली इतकेंच. तिच्या मनांत जराशी असूया उत्पन्न झाली. त्या शेळीच्या पोराचा तिला हेवा वाटला, असें तिच्या चर्येवरील सूक्ष्म फरकावरून दिसत होतें.

तिनें त्यांचा फोटो घेतला.

प्रोफेसर इरावतीला म्हणाले, " इरावती, आतां साऱ्या जगांतील हृदयविकार असलेल्या लोकांना सांगा कीं, बाबानों मरूं नका. प्रो.

मेघनाद यांनीं संजीवनी विद्येचा शोध लाविला आहे. माझा पुढील प्रयोग यशस्वी झाल्यास मरणाचीही भीति माणसाला उरणार नाहीं."

"खरं का हें ?"

"हो हो. खरं म्हणून काय विचारतां ? माझी पत्नी हृदयविकारानें वारल्यापासून यावर कांहींतरी इलाज शोधून काढणं आपल्याला शक्य होईल कीं नाहीं याचा ध्यास मला लागला होता. आणि माझा तर्क खरा ठरेल असें वाटल्यावरून या शेळीच्या काळजावर मी प्रयोग करून पाहिला. शेळीच्या हृदयाचं स्पंदन मी बंद पाडलं आणि माझ्या नवीन शोधानुसार त्याला 'इंजेक्शन' दिलं. सुदैवानं माझ्या कल्पनेबाहेर मला यश आलं. नवीन पद्धतीनें 'इंजेक्शन' दिलं असतां हृदयाचा विकार नाहींसा होतो, इतकेंच नाहीं, तर बंद पडलेलं हृदयाचं स्पंदन पुनः सुरू करतां येतं, इतकं माझ्या प्रयोगानें सिद्ध झालं आहे. आतां मानव जातीची सेवा मला कांहींतरी करतां येईल. माझ्या आयुष्याचं सार्थक होईल ! किती मी धन्य !..." बोलतां बोलतां प्रोफेसर साहेबांचा आवाज कमी कमी होत गेला. त्यांची दृष्टि शून्याकार झाली. ते कोठल्यातरी निराळ्या वातावरणांत विहार करीत असावेत असा इरावतीला भास झाला.

प्रयोगशाळेच्या खिडकींतून त्यांची दृष्टि बाहेर कोठेंतरी खिळली होती. ते आपल्या विचारांत मग्न होते. इरावतीचें अस्तित्व जवळ जवळ ते विसरून गेल्यासारखें दिसत होतें.

त्यांची ती उन्मनस्कावस्था पाहून इरावतीच्या हृदयांतील अस्फुट भावना जागृत झाली. प्रोफेसरांविषयीं तिच्या मनांत कधींकधीं जे ओझ-रते विचार येत असत ते एक होऊन इरावती त्यांच्याकडे लुब्ध दृष्टीनें पाहात राहिली. इतरांच्या दृष्टीनें रूक्ष—सहारा वाटणाऱ्या प्रोफेसरांच्या चेहऱ्यांत तिला कांहींतरी आकर्षण वाटूं लागलें.

प्रयोग शाळेंत सर्वत्र शांतता होती. चोहोंबाजूला प्रयोगाचीं उपकरणें, निरनिराळे शारीरिक नकाशे, जगांतील मोठमोठ्या शास्त्रज्ञांचे लहान लहान

ग्रंथ मांडलेले होते. एका कोपऱ्यांत आपल्या अंगावर मान टाकून शेळीचें पोर डोळे मिटून खुशाल पहुडलें होतें.

इरावतीला आपला हृदयविकार प्रोफेसर बरा करूं शकतील का असा प्रश्न पडला. गेल्याच वर्षी ती बी. एस. सी. झाली होती. आणि तिला हृदयविकार ( हार्ट डिसीज् ) असल्यानें पुढील अभ्यास करण्यास डॉक्टरनीं मनाई केली होती; कारण, अभ्यासाच्या त्रासानें तिचा विकार केव्हां भलत्या थराला जाईल याची खात्री देतां येत नव्हती. म्हणून तिनें कॉलेज सोडून दिलें होतें. कॉलेजांत असतांना हुशार विद्यार्थिनी म्हणून प्रोफेसरांची ती आवडती होऊन राहिली होती. आपले नवे शोध, नव्या कल्पना आणि आंखलेले बेत तिला सांगितल्याशिवाय ते रहात नसत.

ऐन तिशींत त्यांची पत्नी हृदयाविकारानें वारली. त्या दिवसापासून त्यांनीं बंद पडलेलें हृदयाचें स्पंदन पुनः सुरू करतां येईल कीं नाहीं, या गोष्टीचा विचार करून अखेरीला आपली कल्पना प्रयोगावस्थेंत आणली. आतां माणसावरच त्याचा प्रयोग करावयाचें शिल्लक राहिलें होतें. या शोधानें हृदयविकार असलेल्या माणसांच्या हृदयावरील जंतु नाहींसे करून रोग बरा करतां येणार होता; शिवाय, मेलेल्या माणसांचें स्पंदनही पुनः सुरू करतां येणार होतें. माणसावर प्रयोग केल्यावरच त्या शोधाची शहानिशा होणार होती.

  

आणि यावेळीं प्रोफेसर याच गोष्टीचा विचार करीत होते. आपल्या अपूर्व शोधाबद्दल त्यांना आनंद होत होता; पण याचा प्रयोग करायला कोण माणूस मिळतें याची त्यांना फिकीर पडली. प्राणावरचा प्रसंग. प्रयोग यशस्वी झाला तर बरा, नाहीं तर फुकट एक प्राणी नाहक बळी जायचा. जिवावर उदार होऊन आपला प्रयोग यशस्वी करण्यास कोण तयार होतो ! इतका प्राण का कोणाला नकोसा झाला आहे !

आतां, एकादा हार्टडिसीजचा माणूस मिळूं शकेल हें खरें, पण त्याला तरी आपल्या आयुष्याची आशा असतेच. जितके दिवस ढकलतील ते आपले, अशा विचारांत तो असतो. केव्हांतरी असें अवचित् अपघातानें मरायला होणार तें आजच मरावें आणि मशारनिल्हे प्रोफेसर साहेबांचा प्रयोग यशस्वी होऊं देण्याची संधी द्यावी असें कोणी म्हणायला तयार होणें शक्य नाहीं. तें कांहीं मुकें शेळीचें पोर नाहीं. या विचारांनीं प्रोफेसरांना राग आला. त्यांनीं रागाबरोबर आपला खालचा ओंठ चावला आणि त्राग्यानें कपाळाला आंठ्या घातल्या.

त्यांच्या मनांत इरावतीचा विचार आला. तिला हृदयविकार आहे हें त्यांना ठाऊक होतें. पण तिला कसें विचारावें याचा त्यांना प्रश्न पडला. असा प्रश्न विचारणें म्हणजे ' इरावती, तूं मरायला तयार हो ' असें सांगण्यासारखेंच होतें. आणि असें आपण सांगणें आजपर्यंतच्या स्नेहभावाला साजेलसें नव्हतें. प्रोफेसरांना आपल्या शोधाच्या पूर्णत्वा-बद्दल खात्री वाटत असली तरी थोडी धाकधूक वाटत होती.

अशा वेळीं आपलें पुनः लग्न झालेलें असतें तर काय बहार होती, असा विचार त्यांच्या मनांत आला. मग आपण आपल्या पत्नीवरच याचा प्रयोग केला असता. कोणाच्या मनधरणीची जरूरीच नव्हती. इतक्या मुली सांगून आल्या त्या आपण सारें आयुष्य आपल्या आव-डीच्या संशोधनाच्या व्यवसायांत घालवावयाचें या निश्चयामुळें नाका-रल्या याबद्दल त्यांना आतां वाईट वाटूं लागलें.

त्यांनीं एक जोराचा उसासा सोडला.

इरावती त्यांच्या चेहऱ्यावरील हालचालीचें सूक्ष्म अवलोकन करीत होती.

इतक्यांत कोपऱ्यांत पडलेलें शेळीचें पोर उठलें आणि तें, ' बें ऽऽ बें करून ओरडलें. तेव्हां प्रोफेसर आपल्या विचारसमाधींतून जागे झाले.

इरावतीची आणि त्यांची एक दृष्ट झाली. तिनें गोंधळून दुसरीकडे पाहिलें आणि जवळ असलेल्या शेळीच्या पाठीवरून उगाच हात फिरवला.

" अरे, तुम्हांला मी विसरलोंच. माफ करा हं ! " प्रोफेसर दिलगिरीच्या स्वरानें म्हणाले. " त्याचं असं झालं, माझा प्रयोग इतका यशस्वी झाला पण अजूनही त्यांत न्यूनता आहे. माणसांवर प्रयोग केल्याशिवाय त्याची सत्यता कशी पटवून देतां येणार ? आणि असं माणूस मिळणं मला कठीण वाटतं. "

इरावतीच्या ओंठावर 'मी तयार आहें' असे शब्द घोंटाळत होते. तिनें मृदु हास्य केलें आणि आपली तीव्र दृष्टी प्रोफेसरांवर रोंखली.

" कां हंसलांतशा ? " प्रोफेसरांनीं विचारलें.

" सर, तुम्हीं माझा हृदयविकार बरा करूं शकाल का ? " तिनें खोंचक प्रश्न केला.

" हो, हो, एका पायावर ! " असें म्हणून प्रोफेसर खरोखरच आपल्या खुर्चीवरून उठले. त्यांना आशा वाटूं लागली. इरावती कबूल झाली तर आपलें कामच झालें असें त्यांना वाटलें.

" पहा हो, मग माघार घ्याल ! "

" कां बरं माघार घेईन ? मी तर अशा माणसाच्या शोधांतच आहें. माझी काळजी तुम्हीं दूर केली. मी तुमचे आभार कोणत्या शब्दांनीं मानूं ? पण इरावती, तुम्हांला आपल्या जिवाची मुळींच का पर्वा वाटत नाहीं ? "

" नाहीं कशी ? वाटते. पुष्कळ वाटते. पण कांहीं कांहीं प्रसंगीं माणसाला दुसऱ्यासाठीं त्यागही करावा लागतो, नाहीं का ? मानवजातीच्या कल्याणाचा आपण एवढा शोध लावणार, मग माझ्यासारख्या सुशिक्षित मुलीनें त्यासाठीं आपले प्राण देणें हें माझें कर्तव्य आहे. धाडस करायला स्त्रियाही एका पायावर तयार असतात. शिवाय आम्हां स्त्रियांना पुरुषासाठीं त्याग करण्यांत जें सुख असतें त्याची कल्पना पुरुषांना येणार नाहीं. "

प्रोफेसर तिच्याकडे आश्चर्यचकित होऊन नुसते पहात राहिले.

" आणि— " इरावती पुढें म्हणाली, " केव्हां झालं तरी या

रोगानं अकस्मात् मृत्यु येणारच मला. मग जगासाठीं आणि आपणां-
साठीं मी आजच मरायला कां तयार होऊं नये ? ”

प्रोफेसरांना कोडें पडलें. या मुलीनें माझ्यासारख्या परक्यासाठीं एवढा त्याग करायला कां तयार व्हावें ? त्यांना तिच्याविषयीं गूढच वाटूं लागलें. “ एकूण स्त्रिया अशा त्यागी असतात तर ! ” त्यांना स्त्री जातीविषयीं एकदम आदर वाटूं लागला आणि इरावती ही त्यांना एखाद्या देवतेप्रमाणें वाटूं लागली.

ते तिच्याकडे आदरपूर्वक पहात म्हणाले, “ इरावती, तुम्ही मानवजातीची केवढी सेवा करीत आहां याची तुम्हांला कल्पना तरी आहे का ? माझा प्रयोग जर माणसावर यशस्वी झाला तर सारें जग तुमची या विलक्षण धैर्याबद्दल प्रशंसा करील—”

“ आणि प्रो० मेघनाद शेळीच्या पोरासारखे मला डोक्यावर घेऊन नाचतील—असंच कीं, नाहीं ? ” इरावतीनें हंसत हंसत विचारलें.

पण प्रोफेसरसाहेबांचें लक्ष कुठें होतें ! ते कांहींशा विचारमग्न स्थितींत होते. इरावतीविषयीं त्यांना कांहींच उलगडा होत नव्हता. स्त्रियांचें मन अशा प्रकारेंच असतें याची जाणीव त्यांना आजच झाली होती. आणि या शोधाच्या व्यापांतून बाहेर पडल्यावर बायकांच्या मनाचें पृथक्करण करावयाचें, असें त्यांनीं आपल्या मनाशीं ठरवून टाकलें.

“ मग कधीं प्रयोग करूं ? ” प्रोफेसरांनीं विचारलें.

“ वाटेल त्यावेळीं. ”

“ घरच्या माणसांची परवानगी ? ”

“ काय जरूरी त्याची ?—”

“ मग उद्यां सकाळीं येतां ? ”

“ हो, पण एक अट आहे माझी. ”

प्रोफेसरांनीं प्रश्नसूचक मुद्रेनें तिच्याकडे पाहिलें.

इरावती क्षणभर गोंधळली. तिचें तोंड गोरेंमोरें झालें. किंचित् घाब-

रलीसुद्धां ती. आपली अट सांगण्यास तिला मनस्वी संकोच वाटूं लागला.

तिनें थोडा वेळ मनाचा धडा केला. कांहीं झालें तरी आपली अट सांगणें आतां भाग आहे असा विचार ती गंभीरपणें म्हणाली, " सर, दुसरी कोणती अट नाहीं. प्रयोग करण्यापूर्वी आपण दोघांनीं विवाहबद्ध झालं पाहिजे......! "

प्रोफेसरांना ही अट ऐकून दचकल्यासारखें झालें. इरावती आपली थट्टा तर करीत नाहीं, असें वाटून त्यांना थोडा रागही आला. ते म्हणाले, " इरावती, तुम्हीं माझी थट्टा तर करीत नाहीं ? लग्नाचं बंधन मला आतां नको आहे. लग्न करावं असं साऱ्या आयुष्यांत मला कधींच वाटलं नाहीं. एकदां केलं तें सुद्धां वडिलाच्या इच्छेमुळें. पतीचीं कर्तव्यें काय असतात तीं मला माहित नाहींत. माझ्यापासून कोणतीही स्त्री सुखी होणार नाहीं. रात्रंदिवस प्रयोगशाळेंत उपकरणांशीं हितगुज करणाऱ्या माझ्यासारख्या वेड्याला बायकोशीं हितगुज करतां येणार नाहीं ! तेव्हां ही विचित्र अट सोडून द्या तुम्ही ! "

" नाहीं. तसं होणं कदापि शक्य नाहीं. तुमच्यावर मीं प्रेम केलं त्याची परिपूर्णता झालीच पाहिजे. "

" प्रेम केलं ? " हातवारे करीत प्रोफेसर आश्चर्यानें उद्गारले, " मग आजपर्यंत मला तें कुठें दिसलं नाहीं ? "

" तुमच्या दृष्टीला नवे नवे शोध दिसतात. पण त्याच्याबरोबर प्रेमाचा शोध तुमच्या दृष्टीला लागत नाहीं, त्याला काय करावं. ? "

" हां, मी तरी तेंच म्हणतों. अशा निष्प्रेम माणसाबरोबर कशाला लग्न करतां ! "

" ठीक आहे. पण मग तुमच्या प्रयोगाला यायला मीं बांधलेली नाहीं. "

" आं ! काय म्हणतां ? " प्रोफेसरसाहेब गांगरले.

" एवीतेवीं मला हृदयविकार आहेच. केव्हां मरावं लागेल याचा

नेम नाहीं. पण मरणापूर्वी ज्यांच्यावर ज्या भावनेनें मी प्रीति केली त्यांच्या उपयोगीं पडायची संधी मिळती तर मला किती धन्यता वाटली असती ! पण अशी संधी तुम्ही मला देत नाहीं !" इरावती कष्टी होऊन म्हणाली.

"मी कुठं नाहीं म्हणतों आहे ? तुमची अटच चमत्कारिक, त्याला काय करावं ? लग्न न करतांही तुम्हांला माझ्या उपयोगीं पडतां येईल."

"पण त्यानं मला समाधान वाटणार नाहीं. कोणी एक बाई प्रो. मेघनाद यांच्या शोधाच्या उपयोगीं पडली असं लोकांनीं म्हणण्यापेक्षां प्रो. मेघनाद यांची पत्नी त्यांच्या शोधाच्या उपयोगीं पडली असं म्हटलेलं मला जास्त प्रिय वाटेल. कोणी सांगावं मी यांतून सुरक्षित बाहेर पडेन कीं नाहीं ती ! काहीं तास कां होईना, पण जगद्विख्यात् शास्त्रज्ञ आणि संशोधक प्रो. मेघनाद यांची पत्नी होऊन मरावंसं मला वाटतं." इरावतीनें आपले अश्रू पदरानें पुसून टाकले.

"माझ्या शोधाच्या प्रयोगासाठीं तुमच्याबरोबर लग्न करणं मला भाग आहे !" प्रो. मेघनादानीं कठोर आणि रुक्ष उद्गार काढले. त्यांच्या दृष्टीनें शेळी आणि इरावती सारखींच होतीं.

इरावतीला फारच वाईट वाटलें. तिची निराशा झाली. आपल्या प्रयोगासाठीं मेघनाद आपल्याबरोबर लग्न करायला कबूल झाले. आपल्या प्रेमाची त्यांना कल्पना होत नाहीं. तें त्यांच्या गांवींही नाहीं. नुसता 'शोध' त्यांचें डोकें व्यापून राहिला आहे असें तिला वाटलें. पण कसें का होईना, ते कबूल झाले हा विचारच तिला सुखकारक वाटला. एवढया मोठया शोधकाच्या आपण पत्नी आहोंत या दृष्टीनें अभिमानानें तिनें मेघनादाकडे पाहिलें.

  

यानंतर पंधरा दिवसांनीं इरावतीचा प्रो. मेघनाद यांजबरोबर विवाह झाला. आणि लग्नाच्या दुसऱ्याच दिवशीं सकाळीं आठ वाजतां प्रयोगाला सुरवात व्हावयाची होती.

मेघनादांनीं आपल्या प्रयोग शाळेंत सर्व सिद्धता करून ठेविली होती. इरावती आली. तिला वाटलें कीं, आपलें नुकतेंच लग्न झालें आहे, तेव्हां मेघनादांना आपल्याविषयीं कांहींतरी अभिनव अगत्य वाटेल. पण तसें कांहीं झालें नाहीं. तिची फार निराशा झाली. मेघनादांनीं तिचें नेहमींप्रमाणें स्वागत केलें पण तिच्या दृष्टीनें त्यांत अपूर्णता होती.

एका मोठया लांब टेबलावर इरावतीला सरळ पडावयाला सांगितलें. प्रो. मेघनाद आपल्या सर्व साहित्यासह सज्ज झाले. प्रयोग यशस्वी व्हावा याची चिंतामय गंभीरता त्यांच्या मुखावर पसरली होती. त्यांनीं प्रथम इरावतीचे आभार मानून आपल्या प्रयोगाला सुरवात केली. इरावतीच्या डोळ्यांतून आसवांच्या धारा घळघळां वहात होत्या. तिनें सारी भीडभाड सोडून मेघनादांचा एक हात घेऊन आपल्या उराशीं घट्ट धरला. कांहीं क्षण तशा स्थितींत राहून तिनें कठोर मनानें त्यांचा हात दूर केला आणि मानेनें, आपल्या प्रयोगाला सुरवात करा असें सुचविलें.

प्रोफेसरांनीं गुंगीचें औषध देऊन तिला बेशुद्ध केलें. तिच्या हृदयावर आपलें नवीन इंजेक्शन देऊन कांहीं वेळानें तिच्या हृदयाची हालचा-लही बंद केली. तशा स्थितींत तिला कांहीं वेळ पडूं दिल्यावर हृदयाचें स्पंदन पुन्हां सुरू करण्याचें इंजेक्शन दिलें.

तासामागून तास जात होते. अधीर मनानें प्रोफेसर तिच्यामध्यें कांहीं फरक होतो कीं काय हें पहात होते. त्यांची एकसारखी चुळबुळ चालली होती. प्रयोग यशस्वी होतो कीं नाहीं याची त्याना चिंता लागली. चार पांच तास झाले तरी कांहीं परिणाम होईना तेव्हां त्यांची भीतीनें गाळण उडाली. फुकट एका निष्पाप जीवाला आपण बळी देत आहों याची त्यांना खंत वाटूं लागली. बाहेर जरूर पडल्यास खास नर्स आणून ठेविली होती. तिला बोलवावी का या विचारानें किती तरी वेळां घंटा वाजविण्यास गेलेला त्यांचा हात पुनः मागें परतला असेल. त्यांची छाती धडधडूं लागली. शरीराला कंप सुटून सर्वांग घामानें भिजून गेलें.

अशा स्थितींत संध्याकाळीं चार वाजतां तिच्या हृदयाची हालचाल हळू हळू सुरू होत असल्याचे ठोके मेघनादांना नळींतून ऐकूं येऊं लागले.

त्यांनीं समाधानाचा एक मोठा उसासा सोडला. थोडयाच वेळानें हृदयाचें स्पंदन पूर्ववत् सुरू झालें. तेव्हां त्यांचा आनंद गगनांत मावेना. ते वेडयासारखे नाचूं लागले. त्यांच्या गडबडीनें इरावतीला जाग आली. तिनें आपले डोळे उघडण्याचा प्रयत्न केला.

मेघनाद तिला जागी झालेली पाहून तिच्याजवळ गेले आणि तिच्याकडे पहात म्हणाले, " इरावती, इरा, माझा प्रयोग यशस्वी झाला. "

त्या गुंगींतही तिनें मधुर हास्य केलें. त्यानें मेघनादांच्या हृदयांत सुप्तावस्थेंत असलेली प्रीति जागृत झाली.

रात्रीं आठ वाजतां इरावती चांगली शुद्धीवर आली. तिला विलक्षण थकवा आला होता तरी तिचें मन फार प्रसन्न दिसत होतें. तिचा तो आनंद पाहून प्रो. मेघनाद तिच्याकडे विलक्षण रीतीनें आकर्षिले जात होते. त्यामुळें, आपण एवढा अपूर्व शोध लावला याचा अभिमानही ते विसरून गले.

नर्सनें इरावतीला थोडयाच वेळांत चांगली हुषार केली.

इरावतीला प्रोफेसर प्रेमभरानें म्हणाले, " इरा, तूं केवढी मोठी कामगिरी केली आहेस याची तुला कल्पना तरी आहे का ? आपल्या हृदयाचं दान करून तूं माझा प्रयोग यशस्वी केलास. त्रिखंडांत आतां आपली कीर्ति होईल. तुला काय बक्षिस देऊं बोल ? "

" बक्षिस कसलं आलंय् ! हृदयविकारानं मी पछाडलेलीच होतें. आपणही मला हृदय दान देऊन फेड केलीच आहे ! " इरावतीच्या बोलण्यांतील खोंच प्रो. मेघनाद यांना कळली कीं नाहीं कोणास ठाऊक; पण ते मोकळया मनानें हंसत होते इतकें खरें.

—१९३४

## देवता



ऑफीसांतून सुटल्याबरोबर जगदीश अगदीं लवकर घरीं यायला निघत असे, पण आज मात्र त्याचे पाय अगदीं मंद गतीनें उचलत होते. माणिक घरीं वाट पाहात बसली असेल याची त्याला दादही नव्हती; इतका तो आपल्या विचारांत गढून गेला होता. फ्लोरा फाऊंटनवर तो आठ नंबरच्या ट्रॅममध्यें बसला तरीही त्याचे विचार ट्रॅमच्या वेगाबरोबर चालूच होते.

कोटांतील एका फ्रेंच कंपनींत तो चांगल्या पगाराच्या जागेवर नोकरीला होता. आणि स्वदेशी चळवळीमुळें त्याच्या कंपनीचा व्यापार बसून मॅनेजरनें कंपनीची मुंबईची शाखा येत्या पहिल्या तारखेपासून बंद करण्याचें ठरविलें होतें; आणि त्याप्रमाणें कंपनींतील सर्व नोकरांना एक एक महिन्याचा पगार आगाऊ देऊन त्यांना कायमची रजा देण्यांत येणार होती.

जगदीशच्या हातांत मॅनेजरचा हुकूम ज्यावेळीं पडला तेव्हां त्याला अगदीं बेचैन होऊन गेलें; आणि, आतां काय करावयाचें हा विचार त्याच्या मनाला त्रास देऊं लागला.

ऑफिसांतून सुटल्यावर घरीं जाण्यास त्याचें मन नाखुष होतें याचें कारण हेंच.

ट्रामममध्यें बसल्यावर तो विचार करूं लागला, आतां ही अनिष्ट बातमी

आपल्या माणिकला कशी सांगायची ? तिला ही बातमी ऐकून किती वाईट वाटेल, तिला वाईट वाटून तर उपयोगी नाहीं; हा विचार मनांत येतांच त्याला मागील सर्व गोष्टी डोळ्यांपुढें स्पष्ट दिसूं लागल्या.

सहा वर्षांपूर्वी कॉलेजमध्यें असतांना गॅदरींगच्या वेळीं माणकचें नाटकांतील काम पाहून तिच्यावर आपलें कसें प्रेम बसलें, आणि प्रभाकर देसाई यानें तिला पूर्वी मागणी घातली असतांही सुदैवानें आपल्याच प्रेमाचा तिनें कसा स्वीकार केला या गोष्टीची त्याला आठवण होऊन तिच्याविषयींच्या प्रेमानें त्याचें हृदय भरून आलें. पुढें बी. ए. झाल्यावर तिच्याशींच त्याचें लग्न झालें; प्रभाकराचेंही तिची मैत्रीण सुलभा हिशीं लग्न झालें. आणि दोघां मित्रद्वयाच्या मैत्रींत खंड न पडतां उलट ती मैत्री वाढतच गेली.

शिक्षण पुरें होऊन दोघांही मित्रांना चांगल्या नोकऱ्या मिळाल्या. या अवधींत जगदीशला एक मुलगीही झाली होती. तिच्या वाढदि-वसाचे दिवशीं प्रभाकर–सुलभाही आलीं होतीं; आणि त्याचवेळीं येत्या ईस्टरच्या सुटींत सिंहगडावर जाण्याचें त्यांनीं नक्की ठरविलें होतें.

जगदीशला या गोष्टीची आठवण झाली. ईस्टरची रजा पडेल त्यावेळीं आतां आपलें सिंहगडावर कसचें जाणें होतें हा विचार मनांत येऊन माणिक आतां हिरमुसली होणार म्हणून त्याला अति वाईट वाटलें. ज्या माणिकनें प्रभाकरसारख्या श्रीमंताची मागणी दूर सारून आपल्यासारख्या गरिबाच्या प्रेमाला जवळ केलें, त्या आपल्या लाडक्या माणिकची ही साधी मागणी आतां आपल्या-च्यानें पुरी होणार नाहीं तर एकूण ! सिंहगडाच्या प्रवासाचा बेत केला त्यावेळीं तिला कोण आनंद झाला होता; पण आतां तो आनंद तिच्या मुखावर आपल्याला पुनः दिसणार नाहीं. उलट ती उदास झालेलीच आपणाला दिसणार ! पण त्याला तरी आपला काय इलाज आहे ! सिंहगडावर जायचें म्हणजे खर्चाची बाब आणि आपण तर बेकार

झालेले. तेव्हां कांहीं झालें तरी हा बेत तहकूब ठेवावाच लागणार. पुनः केव्हांतरी जातां येईल. नोकरी काय, मिळेल दुसरी. जारीनें खटपट केल्यास आपल्यासारख्या मुंबई युनिव्हर्सिटीची बी. ए. पदवी घेतलेल्या माणसाला नोकरी आठपंधरा दिवसांत सहज मिळेल; माणिकची इच्छा पुरी करतां येईल; पण त्यापूर्वी तिला नोकरी सुटल्याचें कळवून उपयोगाचें नाहीं. तिचें हळवें मन उगाच कष्टी होईल. क्षुल्लक गोष्ट मनाला लावून घेण्याची तिला अतिशय संवय आहे.

हा विचार मनांत येतांच जगदीशला जरा बरें वाटलें. उद्यांपासून नोकरीसाठीं जारीनें खटपट करावयाची असा विचार करून उल्हासित मनानें तो ऑपेरा हाऊसजवळ ट्राम जरा मंद गतीनें आहे, असें पाहून मध्येंच उतरला आणि आपल्या घरीं जाण्यास निघाला.

दारांत पाऊल टाकतांच त्यांची केव्हांपासून वाट पहात बसलेली माणिक पुढें होऊन हंसत हंसत म्हणाली, " आज उशीर कां झाला, बेबी तुमची वाट पाहून नुकतीच झोंपली. "

" थोडा झाला खरा उशीर. तो रघुवीर साठे वाटेंत भेटला त्याच्याबरोबर राहिलों जरा बोलत उभा. " बेबीच्या गालांना हात लावीत जगदीश म्हणाला.

ट्रॅममध्यें त्यानें खूप निश्चय केला होता; पण आतां माणिकच्या डोळ्यांना डोळा भिडविण्याचें त्याला धैर्य होईना. घडधडीत खोटी गोष्ट सांगावी लागत आहे या विचारानें त्याला कसेसेंच झालें. तिला एकदां सांगून टाकावें असें त्याला वाटलें; पण मोठ्या प्रयासानें तो विचार त्यानें बदलून टाकला आणि कपडे काढीत त्यानें विचारलें, " आज काय नवीन बातमी ? "

" इश्श ! बातमी कसली ! वर्तमान पत्राची बातमीदार थोडीच आहे मी ! " मानेला हिसका देऊन माणिक म्हणाली. " पण सुलभाचं पत्र आलं आहे, त्यांत ती म्हणते—"

जगदीशच्या छातींत धस्स झालें. माणिक पुढें म्हणाली, " ' सिंहगडाच्या सफरीचा बेत नक्की ठरला. आतां सुट्टी पडली कीं जायचं. कधीं निघायचं तो दिवस ठरवा.' मग काय लिहिणार तिला ?"

जगदीश क्षणभर स्तब्ध राहिला. मनाशीं कसला तरी ठाम निश्चय करून तो म्हणाला, " माणिक, सिंहगडावर जाण्याचा बेत रद्दीत करावा लागणारसं दिसतं. मला यायला मिळेल कीं नाहीं याबद्दल संशयच आहे—"

" कां यायला मिळणार नाहीं ?" माणिक एकदम म्हणाली.

' त्याचं असं झालं " जगदीश आठवून म्हणाला, " अ—आजच आमच्या ऑफिसांत काम वाढलं आहे. आणि त्यासाठीं मला रहावंच लागणार—"

" पण ईस्टरच्या सुटींत ऑफिस बंद असणार ना ?"

" हो, बंद आहे. पण काम असं आलं आहे कीं तें माझ्याशिवाय दुसऱ्या कोणाला जमणार नाहीं. ऑफिस बंद असलं तरी केव्हां साहेबाचं बोलावणं येऊन जावं लागेल त्याचा नेम नाहीं. तेव्हां सगळ्या गोष्टींचा विचार करून सफरीचा बेत मी रद्दच ठरविला आहे—"

" तुमचं आपलं कांहींतरीच !" निराशेनें माणिक म्हणाली, " त्या मोठ्या साहेबाला या वेळींच बरं आठवलं महत्त्वाचं काम."

ती घरांत गेली आणि चहाची तयारी करूं लागली. तिनें चहा तयार केला आणि जगदीशला दिला. चहा घेतेवेळीं तिच्या मनाचा झालेला हिरमोड आणि त्यामुळें उत्पन्न झालेला अबोला जगदीशला जाणवल्यावाचून राहिला नाहीं. पण तो तरी काय करणार बिचारा !

❦ ❦ ❦

नेहमींप्रमाणें जगदीश ऑफिसांत जातों म्हणून बाहेर जाई. कधीं कधीं सारा दिवस तो बाहेर असे. नोकरी मिळविण्याची तो जोरानें खटपट करीत होता. ऑफिसच्या कामासाठीं असें जावें लागतें म्हणून

माणिकला सांगतांना त्याच्या अगदीं जीवावर येत असे. जिवाला लागलेल्या टोंचणीमुळें घरीं असलेल्या वेळांत पूर्वीसारखें हास्यविनोद करीत माणिकशीं बोलायलाही त्याला साधत नसे. त्यामुळें पूर्वी आनंदित असणारें तें जोडपें मनांतल्या मनांत कष्टी झालें होतें. माणिकला तर जगदीशच्या या चमत्कारिक वर्तनाचें कोडें उलगडत नव्हतें. आपल्या हातून काय चूक घडली याचा ती बारकाईनें विचार करी आणि कांहीं कारण न आढळल्यामुळें ऑफिसच्या वाढलेल्या कामामुळें असा फरक झाला असावा असा कयास तिनें मनाशीं बांधला. आणि जगदीशच्या तोंडावर साहेबाला बऱ्याचशा शिव्याही दिल्या.

सिंहगडावर जाण्याचा बेत तहकूब झाला हें कळविण्यासाठीं एके दिवशीं दुपारीं माणिक दादरवर सुलभेकडे निघून गेली. संध्याकाळीं निरनिराळया ऑफिसांचे दादर चढून उतरून दमलेला जगदीश परत आला तरीहि माणिक आपल्या मैत्रिणीकडून आली नव्हती.

तिन्हीसांजा होईपर्यंत तो तिची वाट पाहात होता. बरोबर धाकटी बेबी असल्यामुळें त्याला काळजी वाटत होती.

आठ वाजतां ती परत आली तेव्हां जगदीश म्हणाला, "इतका वेळ काय करीत होतीस?"

"इश्श! सुलाचं तोंड एकदां उघडलं म्हणजे तें मिटण्याची आशाच नको. गेल्यापासून सारखी बडबडत होती. आणि 'जरा थांब ग, जरा थांब ग' अस्सं चाललं होतं सारखं!" बेबीला जगदीशकडे देत माणिक म्हणाली.

"मी केव्हांचा वाट पाहातों आहे तुझी! म्हटलं एवढं कारस्थान कसलं चाललं आहे."

"इश्श! आमचं कसलं बायकांचं कारस्थान!"

"बायकाच मोठया कारस्थानी असतात." थोडा विनोद करण्याच्या इराद्यानें जगदीश म्हणाला.

"हो. एक सांगायचं विसरलेंच मी. सुलभेनें कीं नाहीं कसलेसें जपानी वाद्य आणलें आहे. आणि आम्ही दोघींनीं मिळून तें शिकावं असं ठरविलं आहे. तें कसं वाजवावं हें शिकण्यासाठीं त्या जपानी कंपनीचा एजंट तिच्याकडे शनिवारीं येणार आहे. मग मी जाऊं ना ?" ती लडिवाळपणानें म्हणाली. संगीताची आवड असणाऱ्या माणिकची ही मागणी जगदीश कसा मोडूं शकणार ?

"जा की, तुला शिकायचं असलं तर अवश्य जा."

तिला आनंद झाला, कसलेसें एक कडवें गुणगुणत ती कामाला निघून गेली.

  

आणि अलीकडे माणिक वरचेवर सुलभेकडे तें तंतुवाद्य शिकण्यासाठीं दादरवर जात असे. जगदीश वर्तमान पत्रांतील 'पाहिजे' या सदरांतील जाहिराती वाचून आपलें नशीब पारखून पाहात असे, पण गेले पंधरा दिवस त्याला निराशाच अनुभवावयास मिळत होती. त्याच्या खिशांत असलेली पुंजीही खलास होण्याच्या मार्गास लागली होती आणि नोकरीचा तर कुठेंच संभव दिसत नव्हता. यानें त्याच्या मनाला काळजी लागून त्याचा आनंदी चेहरा सुकून गेला होता. रात्रीं झोंपल्यावर बिछान्यावर तळमळतांना माणिकनें त्याला किती वेळां तरी पाहिलें होतें. पण ती त्याबद्दल त्यांच्याशीं कांहींच बोलली नाहीं. उलट पूर्वीच्याहून ती विशेष आनंदित असलेली दिसूं लागली. मधून मधून कारण नसतांना स्वतःशीच हंसतांना तिला पाहून जगदीशला आश्चर्य वाटे. पण उलट तें त्याला बरेंच वाटलें. आपल्या दुःखाची झळ तिच्या कोमल मनाला न लागो अशीच तो इच्छा करीत असे. यानंतर पंधरा दिवस झाले. पुढें काय करावें आपल्या लाडक्या माणिकला आणि बेबीला हालांत दिवस काढावे लागणार का, अशा विचारांत तो असतां

रस्त्यावर त्याचा मित्र रघुवीर साठे भेटला. " जगदीश, कुठें चाललास ? जरा गरीबाकडे दृष्टिक्षेप कराल कीं नाहीं ? " त्यानें विचारलें.

" काय म्हणतोस ? "

" तुझं मी अभिनंदन करतों. वहिनीचं काम छान होतं बुवा ! "

" कसलें अभिनंदन आणि कुठली ही वहिनी ?" जगदीशला त्याच्या बोलण्याचा अर्थ न कळून तो आश्चर्यचकित मुद्रेनें विचारूं लागला.

" बनवा बुवा. आम्हांला एकदम अगदीं चकित करायचा विचार दिसतो वाटतं ? पण आम्हांला सारं कळलं बरं का, काल रविवार ना ? हो, परवां शनिवारीं मी दादरवर गेलों होतों देसायांकडे, तिथें तुमच्या राणीसाहेब भेटल्या. तिथूनच नवीन फिल्मचे फोटो घेण्यासाठीं देसाईंची कंपनी जुहूला जायची होती. मीही गेलों त्याच्याबरोबर. वहिनीचें काम छान झालं आं ! आतां फिल्म लागली कीं लोकांच्या उड्या पडतील उडया ! "

जगदीश थोडा गोंधळांत पडला. त्याला नक्की कांहींच कळेना. पण कांहीं संशय मात्र त्याला आल्याशिवाय राहिला नाहीं.

त्याला गप्प राहिलेला पाहून रघुवीर म्हणाला, " बोलत कां नाहीं ? तुला आवडलं नाहीं वाटतं वहिनीचं वागणं ?—हो तेंही खरंच. आणि खरं सांगूं का, जगदीश, प्रभाकराबरोबर वहिनीचं तें पुढें पुढें करून वागणें मला कांहीं बुवा आवडलं नाहीं. आपलं खरं तें सांगतों—"

" सुलभा होती का बरोबर ? " जगदीशनें संशयित स्वरानें विचारलें.

" हो हो, तिनें तर त्यांत नायिकेचं काम केलं आहे. "

जगदीशनें त्याचा निरोप घेतला आणि घराकडे येण्यासाठीं तो भराभर पावलें टाकीत चालूं लागला. त्याचें डोकें तापून गेलें आणि हृदयाला वेदना होऊं लागल्या. प्रभाकराबरोबर माणिकनें असें फिरणें त्याला मुळींच आवडलें नाहीं. आणि सिनेमा फिल्मच्या फोटोच्या भानगडीनें त्याच्या मनाचा गोंधळ उडाला.

तो घरीं आला त्यावेळीं माणिक नुकतीच बाहेरून आली होती आणि ती जगदीशचीच वाट पहात होती. जगदीशला पाहून ती आनंदानें हंसत हंसत म्हणाली, " तुम्हीं कसे अगदीं वेळेवर आलां ! तुमचीच वाट पाहात बसलें होतें. " त्याच्या उदासवाण्या चेहऱ्याकडे पाहून ती दचकून उद्‌गारली, " असं काय ? तोंड उतरलं कां ? डोकं दुखतं का ? " तिनें प्रेमानें त्याचा हात आपल्या हातांत घेतला, " मला कांहीं होत नांहीं " त्रासिकपणानें तो उत्तरला, " माणिक तुला कांहीं मला विचारायचं आहे. "

आणि थोडक्यांत त्यानें रघुवीर साठे कडून कळलेली हकीकत सांगितली आणि त्यानें विचारलें, " याचा अर्थ काय ? "

माणिक खुदकन् हंसली.

" तुम्हांला कळलेली हकिकत बरोबर आहे. प्रभाकर देसाईनीं आपल्या कांहीं गुजराथी मित्रांच्या सहाय्यानें नवीन सिनेमा कंपनी काढली आहे. सिंहगडच्या सफरीचा बेत फिसकटला हें सांगण्यासाठीं मी सुलभेकडे गेलें त्यावेळींच मला ही बातमी लागली. त्यावेळीं दुसरीही एक बातमी मला कळली. नोकरी सुटल्याचं तुम्ही माझ्यापासून कां बरं लपवून ठेवलंत ? माझ्यावर तुमचा विश्वास नाहीं का ?... ती बातमी तिथं कळतांच मला किती वाईट वाटलं ! पण, मला दुःख होऊं नये याच हेतूनें तुम्ही मला तें कळविलें नाहीं हेंही मला समजलं. या संकटांतून सुटण्यासाठीं, सुलभेनें, थट्टेनें ' सिनेमांत काम कर ' असें म्हणतांच मी ती गोष्ट कबूल केली, आणि तुमच्या म्हणण्याप्रमाणें ' कारस्थान ' केलं. नव्या फिल्ममध्यें मी काम केलं आणि त्याबद्दल मला महिना दोनशें प्रमाणें पगारही मिळाला. पतीच्या उपयोगीं पत्नी पडली यांत मी वावगें तें काय केलं ? विद्यार्थीदशेंत नाटकांत काम केलं—ती कला मला यावेळीं उपयोगी पडली. मला ठाऊक आहे, तुम्हांला कदाचित् माझं सिनेमांत काम करणं आवडणार नाहीं. आणि मी तरी तें पुढें कुठें करणार आहे ? तशी आतां गरजच उरलेली नाहीं.— "

इतका वेळ लक्ष लावून ऐकत राहिलेल्या जगदीशानें मध्येंच विचारलें, "कां नाहीं करणार तूं माणिक ?"

"त्यांच्या कंपनीला एका हुशार मॅनेजरची जरूरी असून प्रभाकरपंतांनीं तुमचीच निवड त्यासाठीं केली आहे. तिथें पूर्वीच्या नोकरीहून चांगला पगार मिळेल. मग मला नोकरी करण्याची काय जरूरी !" इतका वेळ हंसत हंसत बोलणारी माणिक आतां किंचित् थांबून जगदीशाच्या तोंडाकडे पाहात रडव्या स्वरांत म्हणाली, " पण, तुम्ही माझ्यावर रागावलां का ?"

"नाहीं, माणिक, माझ्या लाडके ! मी तुझ्यावर कसा रागवेन? तूं खरोखर देवता आहेस !" असें आवेगानें उद्गारून त्यानें तिला जवळ ओढून प्रेमभरानें तिचें चुंबन घेतलें.

तो पुन्हां एकदां म्हणाला, "माणिक, तूं साधी स्त्री नसून देवता आहेस." "नाहीं !" ती उद्गारली, "मी देवता नाहीं. मी आपली लाडकी माणिकच आहे ! आपल्या पतीच्या कारणीं पडणारी एक साधी स्त्रीच आहे !"

-१९३२

# पायांतील वहाण



पांडूची आठवण झाली कीं अजूनही मला कसेसेंच वाटतें. अंगावर शहारे येतात. छातींत बोंचल्यासारखें होतें. त्याचा तो काळासावळा हंसरा चेहरा, अंगांतील फाटकी पैरण, दोन्ही हातांतील चांदीचीं कडीं, कानांतील मुद्या आणि लांबच लांब शेंडी, अगदीं डोळ्यांवर दिसतात.

बिचारा गरीबाच्या पोटीं जन्माला आला ही त्याची केवढी चूक झाली!

त्या दिवशींसुद्धां पांडूचाच विचार माझ्या मनांत वारंवार येऊन मला कष्टी करीत होता. कॉरोनर कोर्टांत ज्यूरर म्हणून मला बोलाविलें होतें. आणि ऑफिसला कांहीं तास तरी 'दांडी' मारायला मिळणार म्हणून मला आनंद होत होता. पण त्याबरोबरच पांडूचा विचार मनांत येऊन मधून मधून मला वाईट वाटत होतें.

दोन महिन्यांपूर्वीच बेशुद्ध पडलेला आणि रक्तानें माखलेला पांडू माझ्या दृष्टीपुढें दिसत होता.

उदास अंतःकरणानें मी कॉरोनर कोर्टांत गेलों. कोर्टाच्या आवारांत पाऊल टाकतांच मला उगाच हुरहुर वाटूं लागली. स्मशानांतला उदास भेसूरपणा तिथें नांदत होता. नाहीं म्हणायला जे. जे. हॉस्पिटलच्या बाजूला मात्र रहदारी दिसत होती. पण त्यांत सुद्धां किती भेसूरपणा!

हॉस्पिटल म्हणजे भूलोक आणि मृत्युलोक ह्यांच्यामधील दुवा ! दोन्ही लोकाची त्यावर छटा पसरलेली असायची.

आणि कॉरोनर कोर्ट म्हणजे चित्रगुप्ताचा दरबार असेंच कोणालाही वाटावयाचें. निदान मला तरी आंत प्रवेश करतांना तसा भास झाला.

निवडक लोकांच्या जाण्यायेण्याच्या हालचाली, प्रेतें कुजूं नयेत म्हणून ठेविलेल्या बर्फाच्या फॅक्टरीचा आवाज, यांखेरीज तेथें कसलीही गडबड नव्हती.

एका दहा बारा वर्षांच्या मुलाच्या मृत्यूची चौकशी चालली होती. तो हॉस्पिटलमध्यें त्या दिवशीं सकाळींच मरण पावला. हकीकत कांहीं मोठी ऐकण्याजोगी आकर्षक नव्हती. कानाचा पडदा फुटून तो मुलगा मरण पावला होता.

पण कानाचा संबंध येतांच मी थोडासा बिचकलों. कांहीं शंका माझ्या मनांत उत्पन्न झाली आणि पांडू नारायण आंग्रे हें नांव कानीं पडतांच मी मोठ्यानें दचकलों. मला जिज्ञासेनें गुदमरल्यासारखें झालें. नांवाची मी खात्री करून घेतली, आणि समोर साक्षीदाराच्या पिंजऱ्यांत बापूसाहेबांना पाहून तर माझी पक्कीच खात्री झाली.

कष्टाचा, निराशेचा आणि उद्वेगाचा एक उसासा मी माझ्या नकळत सोडला.

  

दोन महिन्यांपूर्वींचे सारे प्रसंग, साऱ्या आठवणी माझ्या डोळ्यांपुढून जाऊं लागले. सारीं चित्रें स्पष्ट दिसूं लागलीं. मी त्यांत गुंगून गेलों.

दोन महिन्यापूर्वी आतांच्यासारखा मी एका विमाकंपनींत नोकरीवर नव्हतों. नोकरीसाठीं मला वणवण भटकावें लागत होतें.

मोठ्या शिकस्तीनें मी बापूसाहेबांकडे त्यांच्या दहाबारा वर्षांच्या मुलाला शिकविण्यासाठीं म्हणून राहिलों होतों. शिकवणीला जाण्याचा

पाहिलाच दिवस होता. सायंकाळीं पांच साडेपांच वाजण्याच्या सुमारास मी बापूसाहेबांच्या घरीं जायला निघालों होतों. शाळा नुकतीच सुटून मुलें घरीं जात होतीं.

एका मुलाकडे माझें लक्ष वेधलें. एका सुखवस्तु दिसणाऱ्या मुलाच्या मागून तो चालला होता. त्याच्या हातांत बॅग, पाटीदप्तर होतें. तो त्या बॅगेकडे मोठया कौतुकानें पाहात होता. त्याच्या उघडया बोडक्या अंगावरून तो पुढें जात असलेल्या मुलाचा ' रामा ' होता हें उघड दिसत होते.

तो इतर मुलांकडे मोठया उत्सुकतेनें पाहात होता. आणि त्यांच्या-सारखा बॅग घेऊन ऐटींत चालण्याचा प्रयत्न करीत होता. त्याला तसें करण्यांत मोठी मौज वाटत असावी; मोठें सुख वाटत असावें हें उघड दिसत होतें.

त्यानें इतर मुलाकडे पुनः पाहिलें, तों तीं त्याच्याकडे पाहून कुचेष्टेनें हंसत आहेत असें त्याला आढळून आलें.

त्याचा चेहरा खजील झाला. पुढें चालणाऱ्या मुलाचा आपण गडी आहों याची त्याला जाणीव झाली म्हणूनच कीं काय, त्यानें जलद चालण्यास सुरवात केली आणि आपल्या छोटया धन्याला गांठलें.

मला त्याची कींव आली. आपण इतर मुलांसारखें शिकावें, असेंच त्यांच्यासारखें ऐटींत बॅग घेऊन जावें, असें त्याला वाटत असावें असा भाव मला त्याच्या चेहऱ्यावर दिसला.

मी मनांत विचार करूं लागलों, गरीबांच्या मुलांनाही शिकावें असें वाटतें. पण बिचाऱ्यांना शिकतां येत नाहीं. त्यांची गरीबी आड येते. त्याच्यांकडे पैसा नसतो. पैसा ! पैसा ही सगळ्या गरजांची जननी आहे; गरीबांशीं ती मात्र सावत्र आईसारखी वागते.

गरीबीमुळें या मुलाला शिकतां येत नसेल आणि मला गरीबीमुळेंच पांच रुपयाची शिकवणी करावी लागत आहे.

विचार करतां करतां मी शिकवणीच्या घरीं आलों. आणि वाटेंत दिसलेल्या श्रीमंत मुलालाच मी शिकवायला आलों आहें, असें मला कळून आलें.

आणि तो बॅग घेऊन जाणारा गडी एका बाजूला तांदुळ निवडीत बसला होता.

मी त्याच्याकडे पाहिलें. तोही माझ्याकडेच पाहात होता. माझी नजरानजर होतांच त्यानें आपली दृष्टी दुसरीकडे वळविली.

मी बापूसाहेबांच्या मुलाला शिकवीत होतों. पण त्याचें लक्ष शिकण्याकडे असण्याऐवजीं घरांत कुठेंतरी गुंतून राहिलें होतें. कसलातरी खाद्य पदार्थाचा वास बाहेर येत होता तिकडे कदाचित् तो आशेनें पाहात असेल.

इतक्यांत ' पांडू ' म्हणून घरांतून हांक ऐकूं आली. आणि तांदुळ निवडीत असलेला पांडू घरांत धावत गेला.

मी त्या मुलाला विचारलें, " हा कोण रे ? तुमचा गडी का ? "

" तो माझा गडी आहे. बापूंनीं माझ्यासाठीं ठेवलाय् तो. " माझ्या शिष्यानें उत्तर दिलें.

मी शिकवूं लागलों. पण माझ्या सांगण्याप्रमाणें वागण्याऐवजीं मला त्याच्या लहरीप्रमाणें शिकवावें लागत होतें. कितीतरी वेळ तो घरांत उठून गेला असेल.

पांडू मात्र बाजूला बसून लक्ष देऊन ऐकत होता. मी ज्या वेळीं कांहीं प्रश्न करी त्यावेळीं त्याचे ओंठ उत्तर द्यायला कसे फुरफुरून येत. पण तो आपल्या तोंडाला विवेकाची लगाम घालीत होता, असें दिसत होतें. मी त्याच्याकडे लक्षपूर्वक पाहात होतों.

तो तांदूळ निवडण्याचें काम क्षणभर विसरला. मी शिकवीत असलेला नवा धडा तो कान देऊन ऐकत होता. इतक्यांत बाईसाहेब ओरडल्या, " पांडू, पांडया, तुझें कामावर लक्ष आहे कीं नाहीं ? "

त्यांच्या ओरडण्यानें पांडू तर दचकलाच, पण मीही दचकलों. तें पाहून आमचे शिष्य खुदू खुदू हंसूं लागले.

त्या दिवसापासून पांडू हा माझ्या विचाराचा एक विषय झाला. तो नेहमीं आपला बाजूला कांहींतरी काम करीत शिकण्याकडे लक्ष देऊं लागला. एक दोनदां तर मी त्याला चोरून पुस्तक वाचीत बसलेला पाहिला.

एकदां मी असाच शिकवीत असतां कांहींतरी प्रश्न विचारला होता. पण माझ्या शिष्याला उत्तर देतां येईना. पांडूची उत्तर देण्यासाठीं चुळ-बुळ चालली होती. त्यानें चटकन् उत्तर दिलें.

यामुळें त्याच्या छोटया धन्याचा अपमान झाला. त्या एवढ्याशा पोरानें पांडूकडे डोळे वटारून पाहिलें. त्याच्या डोळ्यांत खुनशीपणा दिसत होता. त्यानें पांडूच्या दोन तोंडांत दिल्या असत्या असाच त्यावेळचा तो आविर्भाव पाहून मला वाटलें. परंतु मीं दुर्लक्ष करून शिकवायला सुरवात केली आणि पांडूही तेथून बाहेर गेल्यामुळें पांडूचा मार चुकला.

चुकला कसला ? मी गेल्यावर पांडूला बाईसाहेबांनीं यथेच्छ बोलून घेतलें आणि मास्तर येतील त्यावेळीं तेथें हजर न राहण्याचा हुकूम फर्माविला. हें मला नंतर कळलें.

या नंतर एक दोन दिवसांची गोष्ट. मला रस्त्यावर पांडू दिसला. मला पाहून तो हंसला.

" काय रे पांडू ? कुठं चाललास ? " मी विचारलें.

" मास्तरइथेंच गेलों होतों. " इतकें बोलून तो उगी राहिला. त्याला कांहीं तरी बोलावयाचें आहे, असें त्याच्या चेहऱ्यावरून मला वाटलें.

" विचार, विचार, काय विचारायचें तुला ? "

" मास्तर, मला लिहायला शिकवाल का तुम्ही ? "

" हो. शिकवीन की ! तुला काय काय येतें ! "

“ माझें पहिलें पुस्तक झालें आहे, उजळणी तीसपर्यंत पाढे येतात मला. ”

“ पांडू, कुठें शिकलास हें तूं ? तुझे आईबाप कुठें आहेत ? ”

“ मी शाळेंत जात होतों मास्तर, ” पांडूला रडण्याचा हुंदका आला. त्याला आईबापाची आठवण झाली असावी.

“ उगी उगी, पांडू, रडूं नकोस ! ”

“ माझे बाबा रेल्वेंत हमाल होते. गेल्या सालीं गाडींतून उतरतांना प्लॅटफॉर्मवर पडून आदळले आणि मेले. त्या दिवसापासून माझी शाळा सुटली. बाबा मला मॅट्रिकपर्यंत शिकविणार होते. मास्तर, आतां मला कोण शिकवील ? ”

थोडा वेळ थांबून त्यानें पुनः विचारलें, “ मास्तर, तुम्ही मला शिकवाल का ? ”

“ होय, शिकवीन बरं पांडू, तुला ! ” त्याच्या पाठीवरून हात फिरवीत मीं उत्तर दिलें.

माझ्या हाताचा स्पर्श होतांच त्याच्या अंगावर शहारे आले.

“ पांडू, तुझी आई कुठें आहे ? ”

“ आई ? आई ! बोरवलीला घरकामाला असते ती. हल्लीं चार महिने भेटली नाहीं ती मला. तिला धाडीतच नाहीं तिची मालकीण !” आईच्या आठवणीनें पांडूला पुनः रडूं आलें.

“ पांडू, तुझें नांव काय रे ? ”

“ पांडुरंग नारायण आंग्रे. मालवणच्या सिंधुदूर्ग किल्लयावर आमचं घर आहे म्हणून आई सांगते ! मी पाहिलेलें नाहीं तें अजून. ”

पांडूला माझ्या हातांत असलेलें लहान गोष्टीचें पुस्तक वाचावयाला दिलें आणि मी हळू हळू घरीं गेलों.

असेच दोन महिने गेले. मला नोकरी मिळाली होती. शिकवणीची कांहीं जरूरी नव्हती. पण आहे हाताशीं ती कां सोडा, या विचारानें

मी शिकवणी सोडली नव्हती. आणि पांडूविषयींही मला अलीकडे ओढा वाटूं लागला होता. मला विचारून तो चोरून शिकतच होता.

एका शनिवारीं मी सायंकाळीं लवकरच शिकवणीला गेलों. बापूसाहेबही शनिवार असल्याकारणानें ऑफिसांतून लवकर आले होते.

मी कसलासा धडा शिकवीत होतों आणि एका वाक्याचा अर्थ आमच्या शिष्यवराला मीं विचारला होता. बराच वेळ झाला तरी त्याला उत्तर देतां येईना. माझी निराशा झाली. इतकी उरस्फोड करून मी शिकवीत असतां एका शिकविलेल्या धड्यांतील वाक्याचा अर्थ सांगतां येऊं नये याचा मला राग आला.

मी रागानें म्हटलें, " त्या पांडूची तरी अक्कल घे ! "

पांडू जवळच उभा होता. त्याला मी विचारिलें, " पांडू, सांग पाहूं या वाक्याचा अर्थ ! "

पांडूनें जें उत्तर दिलें त्यानें मी तर खूषच होऊन गेलों. मी त्याला शाबासकी दिली.

आमचे शिष्य महाराज रागानें आणि अपमानानें लालबुंद झाले. दणादण पाय आपटीत तो पांडूला शिव्या देत घरांत निघून गेला.

आणि थोड्या वेळानें बापूसाहेब घरांतून बाहेर आले. त्यांचा तो नृसिंहावतार पाहून माझी तर भीतीनें गाळणच उडाली.

त्यांनीं पांडूचा एक हात धरून त्याला हिसकावलें आणि ते ओरडले, " हरामखोरा, शहाणा झालास काय ? " त्यांनीं पांडूच्या श्रीमुखांत एक जोराची थप्पड लगावून दिली.

त्या दणकट थप्पडीनें पांडू कोलमडून धाडदिशीं खालीं पडला.

मी पुढें झालों आणि पाहिलें तों त्याच्या डाव्या कानांतून रक्ताची नदी वाहात होती. तो बेशुद्धावस्थेंत निपचित पडला होता. बापूसाहेबांचे उगारलेले हात तसेच होते. ते त्याच्याकडे क्रोधाविष्ट दृष्टीनें पहात राहिले.

मला चीड आली. एका निरपराधी मुलाला झोडपणाऱ्या त्या सुशिक्षित मांगाची मला चीड आली. मी त्वेषानें ओरडलों, " बापूसाहेब काय केलंत हें ? तुम्हांला वेड तर लागलें नाहीं ? काय बरं त्या मुलाचा अपराध होता ! तो गरीब झाला हा त्याचा अन्याय का ? त्यासाठीं तुम्ही पशूसारखें त्याला मारावें अं ? "

" गप्प बैस. मास्तरडया ! " बापूसाहेब ओरडले, " मला शहाणपणा शिकवूं नकोस. तूंच त्याला चढवून ठेवलास. पायांतील वहाण पायांत असावी, तिला डोकीवर घेऊं नये. " असें म्हणून त्यांनीं आपल्या जाकीटाच्या खिशांतील दोन नोटा माझ्या अंगावर फेंकल्या आणि म्हणाले, " हा घ्या तुमचा पगार आणि काळें करा येथून. "

मलाही त्वेष आला होता. मास्तरडया म्हणून हिणविणाऱ्या त्या गृहस्थाचा मला राग आला होता. त्या पैशांकडे ढूंकूनही न पाहतां मी तसाच तडक घरीं परतलों.

त्यानंतर पांडूची मला कांहींच खबर नव्हती. त्याला भेटावें असें वाटे; पण त्याला भेटण्यास बापूसाहेबांकडे जाण्यास माझें मन धजावेना. पांडूला हॉस्पिटलमध्यें ठेविलें आहे अशी बापूसाहेबांच्या एका गडयाकडून नंतर मला माहिती मिळाली; पण मीहि नंतर त्याला भेटण्याचा प्रयत्न केला नाहीं. आणि इतर व्यवसायांत मन गुंतल्यामुळें मला वेळही झाला नाहीं.

त्याची आठवण झाली, विशेषतः तो शेवटचा प्रसंग आठवला कीं, मी अस्वस्थ होत असें. पण ही अस्वस्थता निष्क्रियच होती. इच्छा असूनही मी त्याला भेटण्याचें टाळीत होतों.

  

हे सारे प्रसंग माझ्या डोळ्यांपुढून जात होते इतक्यांत कॉरोनरनीं ज्यूरीचें मत विचारलें. तेव्हां मी माझ्या विचारांतून दचकून जागा झालों.

मयताला कानाचा विकार होता आणि त्यांत डाव्या कानाचा पडदा

फुटून तो मरण पावला, असा पांडूच्या मृत्यूसंबंधीं ज्यूरीनें आपला अभिप्राय दिला. मीही एकाद्या नंदी बैलासारखी मान हालवून या निकालाला संमती दिली. इतकी माझी मति निर्बुद्ध होऊन गेली होती.

समोर बसलेले बापूसाहेब माझ्याकडे भयचकित मुद्रेनें पहात आहेत असा मला भास झाला.

जोरानें उठून खरी हकिकत सांगावी अशी मला शिरशिरी येत होती. इतक्यांत कोर्ट उठलें. मला धीर झाला नाहीं. अत्यंत जड पावलांनीं मी कॉरोनर कोर्टांतून बाहेर पडलों.

माझ्या डोळ्यांपुढें पांडूची क्रुद्ध बालमूर्ति दिसत होती.

—१९३४

# खोटें नाणें




घड्याळांत बाराचे ठोके पडतांच किसन आपल्या विचारसमाधींतून जागा झाला. त्या जुनाट जपानी घड्याळाचे फुकटे ठोके त्याच्या कानांत शिरले, पण टेबलावर डोकें टेकून तो राहिला होता त्याच स्थितींत तो पडून राहिला. त्यानें डोळे उघडून भिंतीवर पाहिलें. घड्याळांत बरोबर बारा वाजून मिनिटकांटा हळूहळू पुढें जात होता.

पडल्या पडल्याच तो आपल्या दुकानांतील वस्तूंचें निरीक्षण करूं लागला. घड्याळें दुरुस्त करण्याचें सामान अस्ताव्यस्त पडलें होतें, कित्येक हत्यारें तर तांबून गेलीं होतीं. कांहीं जुनीं पुराणीं घड्याळें व घड्याळाचे कांहीं भाग इतस्ततः पडलेले दिसत होते. बाहेरील त्याच्या नांवाचा बोर्ड एका बाजूचा आधार तुटल्यामुळें लोंबकळत होता.

त्यानें खिन्न मनानें त्यांचें निरीक्षण चालविलें होतें. प्रत्येक वस्तु खिन्नतेनें आपल्याकडे पहात आहे असेंच त्याला वाटलें. त्याच्या मुद्रेवर चिंतेचें जाळें पसरलें होतें. त्यामुळें त्याच्या गौर तांबूस मुखावर बुरशी-सारखी काजळी चढलेली दिसत होती. यावेळीं त्याच्या डोक्यांत विचारांचें काहूर माजलें होतें.

गेलें सबंध वर्ष त्याचीं हत्यारें गंजून जात होतीं. काम नसल्यामुळें त्याची उपासमार होत होती. ज्या गिरणीकामगारांवर त्याचें पोट त्यांनाच खायला मिळत नव्हतें. त्यांचीही संप, बेकारी आणि पगारकाट यांनीं उपासमार होत होती. चैनीच्या वस्तूंना आतां कोणीही विचारीत नव्हता. घड्याळावाचून आतां कामगाराचें मुळींच अडेनासें झालें. त्यांच्या घडयाळाचे ठोके आतां मारवाडयाच्या तिजोरींत ऐकूं येत होते.

त्यामुळें किसन घडयाळजी उघडा पडला. कांहींतरी हरहुन्नरी करून त्यानें गेलें वर्ष कसेंबसें काढलें. आतां निभाव लागणें त्याला कठीण दिसत होतें.

घडयाळाचा धंदा भरभराटींत असतां त्यानें अल्प किंमतींत स्वदेशी घड्याळें लोकांना कशीं देता येतील याचा शोध चालविला होता. आणि दोन तीन वर्षें सारखें खपून त्याच्या प्रयत्नाला यशही येत होतें. त्यानें तयार केलेलें 'मॉडेल' त्याच्या पूर्ण पसंतीस उतरलें होतें. तशा तऱ्हेचीं घड्याळें गोरगरिबांनाही अत्यंत अल्प किंमतींत घेतां येतील याचा त्याला विश्वास वाटत होता. त्याला आरंभीं बऱ्याच भांडवलाची जरूरी होती. पुष्कळांकडे त्यानें आपल्या नव्या कल्पनेबद्दल माहिती सांगून पैशाची याचना केली. परंतु भिकार किसन तो काय आणि तो नवीन घड्याळ शोधून काढणार म्हणून, त्याचा बहुतेक सर्व ठिकाणीं उपाहासच करण्यांत आला. त्याचें म्हणणें पुरतेपणीं ऐकून घेण्याची कोणी तत्परता दाखविली नाहीं. एक दोन बोहरी व्यापाऱ्यांनीं भावी नफ्याच्या आशेनें शंभर दोनशें रुपयांना घड्याळांची कल्पना विकत मिळाली तर किसनला त्यांनीं नव्या कारखान्यांत नोकरीस ठेवण्याचेंही वचन दिलें. पण किसनला ती कल्पना आवडली नाहीं. भांडवलदाराला तो आपला भागीदार म्हणून घ्यायला कबूल होता. अर्थात् त्यांना किसनचें म्हणणें पटणें शक्यच नव्हतें.

त्यामुळें किसन मनांतल्या मनांत दुःखी असे. आपला शोध फुकट

जातो म्हणून त्याला हळहळ वाटे. आपल्या गरीबीचा त्याला तीव्र संताप येई. त्याला इलाज नव्हता.

आणि आतां त्यांत बेकारीच्या दिवसांची भर पडली. दुकानांत माशा मारण्यापलीकडे त्याला कांहीं उद्योग नव्हता.

काय केलें असतां आपला या गरीबींतून उद्धार होईल याचा विचार करण्यास मात्र भरपूर वेळ मिळत होता.

आतांही तो असाच विचार करीत घड्याळें दुरुस्त करण्याच्या टेबलावर डोकें टेकून राहिला असतां विचाराच्या गुंगींत तो रंगून गेला होता. .

घड्याळांत बाराचे ठोके पडले. तरीहि त्याचे विचार चालूच होते.

थोड्या वेळानें त्याच्या पाठीमागें कंकणध्वनि झाला आणि पडदा किंचित् सरकला गेला. गौरीनें आंतून उत्सुकतेनें पाहिलें. तिनें बाहेर वांकून पाहिलें तेव्हां काळया ढगांतून चन्द्राची कोर बाहेर पडतांना दिसावी तशी ती आंतील अंधारांत दिसली. गौरी उंच, कृश आणि गौरवर्णाची होती. तिच्या तोंडावर मोहकपणा दिसत होता, पण त्यांत तेज नव्हतें.

तिनें किसनकडे अगदीं निरखून पाहिलें तों तो हळू हळू हंसत आहे असें दिसून येतांच तिला अत्यंत आश्चर्य वाटलें. विसरलेली गोष्ट एकदम आठवावी म्हणजे डोळ्यांत जें तेज दिसतें तशी त्याची मुद्रा तिला दिसून आली.

असें कां व्हावें ?

तिला मोठा प्रश्न पडला.

गेल्या सबंध वर्षांत तिनें त्याला असा एकांतांत आनंदित झालेला पाहिला नव्हता. यामुळें त्याच्या आनंदाचें कारण ती शोधूं लागली. घड्याळांचा कारखाना उघडायला कोणी पैसे देण्याचें तर कबूल केलें नसेल ? पण ही कल्पना आतांपर्यंतच्या अनुभवावरून तिला खरी

वाटेना. पडद्याआड राहून तिनें कांहीं वेळ विचार केला पण तिला कारण आढळेना.

किसनच्या मनांत कसलातरी मनाला आनंदविणारा विचार येत होता. त्यामुळें त्याचें तोंड उज्वल झालें. मनांत आलेल्या शक्याशक्यतेचा तो विचार करूं लागला. आकाशांतील रंगांचे क्षणांत बदल व्हावे तसे त्याच्या मनांतील विचार बदलत होते. मनांतील विचार कृतींत उतरविणें कितपत शक्य होईल याचा त्याला विचार पडला. एक विचार सांगे, हें तूं करूं नकोस; तर दुसरा सांगे, कर बेलाशक; धाडसाशिवाय यशप्राप्ति होत नसते. सबंध वर्षांत आलेला अनुभव डोळ्यांपुढें येतांच त्यानें आपला ओंठ जोरानें चावून आपला विचार कृतींत आणण्याचा निश्चयच करून टाकला.

त्याचें तोंड क्षणांत उमललें. परिस्थितींतून पार पडण्यासाठीं कांहीं तरी मार्ग आहे, या विचारानें तो आनंदित झाला.

त्यानें टेबलावरील डोकें वर उचललें आणि स्वतःशींच तो पुटपुटला, " हो, असंच करायचं ! "

गौरी हा सारा चमत्कार आंतून पहात होती. तिला आतां मुळींच राहवेना. मनाचा निश्चय करून ती बाहेर आली आणि तिनें भीत भीत किसनला विचारलें, " एवढा आनंद कसला झालाय् ! काय करायचं ठरविलं ? "

त्यानें चमकून मागें वळून पाहिलें. तिच्याकडे पाहून किंचित् हंसून तो उगाच राहिला.

" म्हटलं, एवढा आनंद कसला झालाय् ? " तिनें आनंदून विचारलें.

" हो ! आनंद झालाय् खरा. आतां आपल्याला हालांत दिवस काढायला नकोत अशी युक्ती मी शोधून काढली आहे ! "

तिनें प्रश्नार्थक मुद्रेनें त्याच्याकडे पाहिलें. " कसली युक्ती काढलीय् शोधून—"

" आहे एक ! पाहूं कितपत यश येतं तें. गेलं वर्ष किती बरं आपण

हाल्लांत काढले ! या गिरण्यांवर आपलं जीवन. गिरणीकामगारांना चार पैसे मिळाले; ते आनंदांत असले तर आपली पोटें भरायची. तेच संपाच्या नि बेकारीच्या वावटळींत सांपडल्यावर आमची काय गत ! होतं नव्हतं तें विकून टाकावं लागलं. वडिलोपार्जित जमीनही गहाण टाकावी लागली. माझा शोध......" त्याच्या डोळ्यांत अश्रू आले. कंठ भरून आला.

" कशाला त्या आठवणी उकरून काढतां ! झाल्या गोष्टी का आतां सुधारतां येणार आहेत ? कशाला उगाच मनाला त्रास करून घेतां ? अशानं..." तिच्याही डोळ्यांत, काढलेल्या हालांची चित्रें समोर दिसून, पाणी आलें.

" आपले शेजारी सज्जन. गरीब असूनही त्यांची आपणांला मदत होते, पण आतां दिवसेंदिवस कठीण दिवस येत चालले आहेत. चार पैसे उसने सुद्धां कोणी देणार नाहीं. तेव्हां मी म्हणतों, यांतून कांहींतरी मार्ग काढला पाहिजे. नाहींपेक्षां उपाशीं मरावं लागेल. यांतून निभावून जाण्यास मार्गही मी काढला आहे. तुला आतां हाल काढायला नकोत. सुशीला पण दूध घेतां येईल. तुम्ही आनंदांत राहाल. माझा शोधही......"

" पण अशी कोणती कामधेनू सांपडली तें नाहीं सांगितलं ! "

" वेडी आहेस तूं, बायकांना काय करायच्या आहेत पुरुषांच्या गोष्टी ! "

" पण......"

" पण बीण कांहीं नाहीं. चल जा, जा घरांत ! " त्यानें तिला झिडकारून लाविलें.

गौरी आंत गेली. तिच्या डोळ्यांत पाणी आलें. किसनच्या अशा तऱ्हेवाईक स्वभावाचा तिला अलिकडे नेहमींचाच अनुभव होता. पण आजच्या प्रसंगानें तिला अधिक वाईट वाटलें. नवऱ्यानें काय युक्ति योजली तें समजून घेण्याची तिला उत्कंठा लागून राहिली. किसन हरहुन्नरी होता.

त्याच्या डोक्यांतून अजब कल्पना निघत असत. घड्याळाच्या नव्या शोधावरून तिला त्याच्या हुशारीबद्दल अभिमान वाटत होता. अशाच प्रकारें कांहींतरी क्लृप्ति त्यानें काढली असावी असा तिनें तर्क केला. पण या तर्कानें कांहीं तिचें समाधान झालें नाहीं. हुरहूर, संशय, जिज्ञासा असें कांहींतरी तिच्या मनाला लागून ती बेचैन झाली.

किसनच्या हालचालीवर लक्ष ठेवण्याचें तिनें ठरविलें.

किसन शून्य मनानें परळवरील एका गल्लींतील आपल्या घड्याळाच्या दुकानांत खुर्चीवर बसून रस्त्यावरील जाणाऱ्या येणाऱ्या लोकांकडे पहात होता.

इतक्यांत घरवाला भय्या त्याच्या पुढयांत दत्त म्हणून उभा राहिला. सलाम ठोकून त्यानें म्हटलें, " काय किसनशेट, भाडें कधीं देतां ! एक वर्ष झालं बघा. टांच आणावी लागेल आतां ! "

" हें पहा रामदिन, आतां टांचबिच आणण्याचं कांहीं कारण नाहीं. जसा वर्षभर थांबलास तसाच आणखी पंधरा वीस दिवस थांब. एका खेपेलाच तुझं भाडं चुकतं करून टाकतों. चल. जा इथून. बरोबर पंधरा दिवसांनीं ये पुन्हां ! " असें म्हणून किसन त्याच्या उत्तराची अपेक्षा न करतां झट्दिशीं घरांत निघून गेला.

  

रामदिन भय्या आं वासून हळूहळू निघून गेला.

मध्यरात्रीं सर्वत्र सामसूम झाल्यावर किसन आपल्या कामाला लागत असे. पंधरा दिवस असा त्याचा कार्यक्रम चालला होता. तो काय करीत आहे, हें समजून घेण्याची गौरीला अत्यंत उत्कंठा लागली होती. सारी रात्र जागून कार्य करण्यासारखा त्याचा उद्योग काय आहे याचा तिला उलगडा होत नव्हता.

तिनें पुनः एकदां किसनकडे विचारपूस केली पण तुसडेपणानें उत्तर देण्यापलीकडे त्यानें कांहीं सांगितलें नाहीं. त्यामुळें गौरीची उत्सुकता वाढली होती. ती त्याच्या पाळतीवर राहिली.

एकदां मध्यरात्रीच्या सुमारास ती जागी झाली. बाहेरील खोलींत तिला उजेड दिसला.

ती उठली. अगदीं हलक्या पावलांनीं तिनें किसनच्या खोलींत प्रवेश केला. त्याच खुर्चीवर बसून किसन कसलातरी कागद पाहाण्यांत गुंतला होता. तो अगदीं निरखून पाहात होता.

गौरीला तो कागद नोटेसारखा दिसला. चपापून, अत्यंत आश्चर्यचकित होऊन ती उद्‌गारली " काय नोट ! "

किसननें मागें वळून पाहिलें. गौरी उभी होती.

तो क्षणमात्र दचकला.

" कसली नोट ? कोणी दिली ?" तिनें घाबरून विचारलें.

" तुला काय करायचं ? जातेस कीं नाहीं इथून ? "

गौरी जागची हालली नाहीं.

तेव्हां किसन रागानें उठला. अगदीं झटक्यानें उठला. त्या झटक्यांत टेबलाला त्याचा धक्का लागून टेबलावरील कोरे करकरीत रुपये जमिनीवर पडून त्यांचा आवाज झाला.

त्या आवाजानें किसन दचकला. त्यानें भीतीनें आजूबाजूला वळून पाहिलें.

गौरीनें एक रुपया उचलून घेतला आणि टेबलावरील हत्यारांकडे पाहिलें. ती भीतीनें उद्गारली, " काय, खोटें नाणें ? "

  

दुसरे दिवशीं रामदिन भय्या भाड्याच्या पैशाबद्दल दिलेल्या नोटा मोजून घेत असतां किसननें एवढे पैसे आणले कोठून याचें आश्चर्य करीत होता. कांहीं का असेना आपलें भाडें चुकतें झालें, या विचारानें त्याचें समाधान झालें.

त्या दिवशीं किसननें आपला दाणेवाला, दूधवाला, कपडेवाला यांचें देणें देऊन टाकलें.

गौरी चुळबुळ करीत होती. पण लहानग्या सुशीलेला पोटाशीं धरून अश्रुपात करण्यापलीकडे तिच्या हातीं कांहीं नव्हतें.

दुपारीं किसनला एक मोठें गिऱ्हाईकही आलें. एक भलें मोठें घड्याळ दुरुस्त करण्यासाठीं एक गृहस्थ किसनच्या दुकानांत आला. किसनला ही घड्याळाची कटकट नको होती. तो म्हणाला, " हें पहा आतां असलीं कामें करण्याचं मी सोडून देणार आहें. मी एक नवीन घड्याळ शोधून काढलं असून त्यांचा कारखाना लवकरच सुरू करणार आहें. सध्यां त्या कामाच्या धांदलींत मी असून त्यामुळें हें काम करायला मला वेळ नाहीं. माफ करा ! "

" अस्सं. आपण नवीन घड्याळाचा शोध लाविला आहे, असं ऐकूनच मी येथें आलों. आपल्यासारख्याच्या हातून माझं घड्याळ दुरुस्त व्हावं ही इच्छा. आपण मागें कारखान्यासाठीं पैशांच्या अडचणींत होतां असं ऐकतों. आपली मर्जी असेल तर मी आपणांला थोडी फार मदत करूं शकेन. " त्या गृहस्थानें अदबीनें उत्तर दिलें. आणि किसनच्या दुकानाचें निरीक्षण चालविलें.

" हो, मी पैशांच्या काळजींत होतों खरा. पण आतां ती काळजी दूर झाली आहे. आपण मदत करण्यास तयार आहां याबद्दल आपला मी अत्यंत आभारी आहें. माझ्यासारख्या गरीब, पोटार्थी माणसानं आपल्यासारख्याचं काम नाकारावं याची मला क्षमा करा. एक वेळ अशी होती कीं, त्यावेळीं मी काम नाहीं म्हणून उपाशीं मरत होतों. माझ्या शोधाला मदत व्हावी म्हणून दारोदारीं फिरत होतों. पण त्यावेळीं माझी कोणाला दया आली नाहीं. पोटासाठीं मला नाहीं नाहीं ते धंदे करावे लागले...... " किसनचे डोळे ओलावून क्षणांत त्यांतून पाण्याच्या धारा वाहूं लागल्या.

" पण आतां ती स्थिती पालटली आहे. परमेश्वराला माझी दया आली. त्यानं मला अचानक मदत पाठविली. आतां माझ्या नव्या शोधाकडे मला लक्ष द्यायला हरकत नाहीं. तेव्हां माफ करा. आपलं काम मला घेतां येणार नाहीं ! "

त्या गृहस्थाच्या चेहऱ्यावर किसनची कहाणी ऐकून कांहीं परिणाम झालेला दिसला नाहीं. किसनच्या बोलण्याकडे त्याचे कान पूर्णपणें लागून राहिलेले होते. परंतु त्याचे डोळे चोहोंकडील वस्तूंचें निरीक्षण करीत होते.

"असं म्हणूं नका." तो गृहस्थ म्हणाला, "आपल्या हातून आमचं काम व्हावं अशी आमची बलवत्तर इच्छा आहे. आणि ती पुरी करणं आपल्या हातीं आहे. आपल्या हातचं शेवटचं काम आम्हांला लाभण्याचं श्रेय तुम्ही द्याच आम्हांला!"

गौरी पडदा किंचित् बाजूला सारून आलेल्या गृहस्थाकडे पहात होती. तिचें मत त्याच्याविषयीं चांगलें झालें नाहीं. तिला त्याची भीतीच वाटली.

"तेव्हां," तो गृहस्थ म्हणाला, "घडयाळ तुमच्याकडे ठेवून जातोंच मी. देणगीची काळजी करूं नका. तुम्हांला अशी देणगी देऊं कीं, त्याची तुम्हांला जन्मभर आठवण राहील. बरं येतों मी!"

किसन आपल्या विचारांतच होता. तो गृहस्थ केव्हां उठून गेला हें सुद्धां त्याला कळलें नसेल.

गौरी बाहेर आली.

त्याच्याजवळ जाऊन उभी राहिली. आपलें अस्तित्व त्याला कळलें नसावें असें तिला वाटलें. ती सुशीलेला घेऊन कांहीं क्षण तेथेंच उभी राहिली.

आणि सुशीला जेव्हां थोडीशी रडली तेव्हां किसन आपल्या विचारां-तून जागा झाला. त्यानें गौरीला जवळ उभी असलेली पाहून दुसरीकडे मान वळविली.

"आतां आलेले गृहस्थ कोण होते?"

"कां, तुला हल्लीं साऱ्यांचाच संशय येऊं लागला!"

"तसं नव्हे. पण एकंदरींत गृहस्थ बरा दिसला नाहीं."

किसन कांहीं बोलला नाहीं.

"...तो आल्यापासून सारखा चोहीकडे न्याहाळीत होता. येथील, प्रत्येक वस्तु जणूं प्रदर्शनासाठींच मांडली होती! तो कोणी पोलिसविलीस तर नसेल?..."

किसन विजेचा झटका बसावा तसा नकळत दचकून उभा राहिला.

डोळे फाडून त्यानें गौरीकडे पाहिलें. त्याचा तो भेसूर आविर्भाव पाहून छोटी सुशीला भेदरून ओरडली. तेव्हां गौरी लगबगीनें आंत गेली.

❦ ❦ ❦

त्या रात्रीं पहांटे उजाडेपर्यंत किसन आपल्या उद्योगांत निमग्न होता. बाहेर जाऊन किसननें पाहिलें तों उजाडूंही लागलें होतें.

इतक्यांत रामदिन भय्यानें दरवाजा ठोठावून किसनला हांक मारली.

दार ठोठावणारा रामदिन भय्याच आहे, हें पाहून गडबडलेला किसन थोडा सांवरला. त्यानें आवराआंवर केली आणि दरवाजा उघडला.

रामदिन आंत आला आणि म्हणाला, "शेट, माझा गरीबाचा असा गळा कां कापतां?" त्यानें आपल्या खिशांतून नोटा बाहेर काढून त्या किसनच्या अंगावर फेंकल्या.

किसनचा चेहरा कावराबावरा झाला. "रामदिन, काय म्हणतोस तूं हें?"

"काय म्हणणार, कपाळ माझं. आतां भोगा—"

रामदिनचें वाक्य पुरें होण्यापूर्वींच कालचा मनुष्य दत्त म्हणून उभा.

त्याला पहातांच किसनच्या अंगांत वीज चमकली. त्यानें भीतिनें आवंडा गिळला. पण तोंड सुकून गेल्यामुळें तोही गिळतां येईना. "नमस्कार!" तो गृहस्थ अदबीनें म्हणाला. "घड्याळ तयार झालं असेल म्हणून चौकशी करायला आलों होतों. झालं नसल्यास तें मी परत नेणार आहे. आपल्यासारख्या कल्पक शोधकाला असलं हलकं काम सांगणं म्हणजे आपल्यासारख्या थोर गृहस्थाचा अपमान करण्यासारखं आहे! मग काय झालं त्याचं?"

किसनला एक शब्दही बोलण्याचें भान राहिलें नव्हतें.

आंतील दरवाजावर उभी राहून गौरी थरथर कांपत होती.

त्या गृहस्थानें शिटी फुकतांच रस्त्यावर असलेले साध्या वेषांतील दोन पोलिस आंत आले.

त्यांनीं किसनला धरून ठेविलें.

किसनच्या दुकानाची झडती घेतली. टेबलावर नोटा आणि खोटीं नाणीं पडलेलीं होतीं. नाणीं पाडण्याचें यंत्रही बाजूला होतें.

किसनला पकडलेला पाहतांच गौरीनें किंकाळी फोडली. झंझावातांत सांपडलेल्या केळीसारखी ती धाडकन् खालीं पडली.

किसन दगडासारखा निश्चल होता.

गौरीची आरोळी आणि पोलिसाचें आगमन यानें लोकांची गर्दी जमली.

किसनसारख्या पापभीरू, गरीब आणि सज्जन माणसाला पोलिसांच्या अटकेंत पाहून लोकांना आश्चर्य वाटलें. त्यांनीं काय झालें याची चौकशी केली.

रामदिन भय्यानें सारी हकीकत त्यांना सांगितली.

पण त्यावर विश्वास ठेवायला किसनचे शेजारी तयार नव्हते.

अखेर पंचनामा झाला. बनावट नाणीं करण्याचें यंत्र सांपडलें तेव्हां त्यांची खात्री होऊं लागली.

त्यांना किसनविषयीं सहानुभूति वाटली; ते आपापसांत कुजबुजूं लागले.

त्यांच्यापैकीं किसनच्या एका म्हाताऱ्या शेजाऱ्यानें कळवळून उद्वेगानें विचारलें, " किसन, किसू, काय केलंस हें ? अशी कशी दुर्बुद्धी तुला आठवली ?"

किसन कांहीं बोलला नाहीं.

" किसन, बोल, कशासाठीं हें दुष्कर्म केलंस ? "

किसनचा गळा दाटून आला. त्याच्या डोळ्यांतून अश्रूंचा प्रवाह वाहूं लागला. त्यानें वर डोळे लाविले आणि निराशेनें मान हालवून पोटावर हात मारला.

—१९३४

# भाजीवाली



नेहमींप्रमाणें सगुणा म्हातारी भाजीची टोपली डोकीवर घेऊन ठाकुरद्वारच्या रस्त्याकडे हळूहळू चालली होती. वार्धक्यामुळें तिच्यानें चालवत नव्हतें. डोकीवरील भाजीचें ओझेंही तिला सहन होत नव्हतें. तरीही ती चालतच होती.

तिला श्रम होत होते. तरी चेहऱ्यावर पसरलेल्या सुरकुत्यांमुळें तिचें दुःख स्पष्ट दिसत नव्हतें. किंबहुना तिचा चेहराच असा दुःखी कष्टी घडला होता कीं, त्याच्यांत इतर भावना मिसळून जाव्या. त्यामुळें तिच्याकडे पाहणारास तिच्याविषयीं एकदम अनुकंपा वाटावी.

भाजी खरेदी करून ती ठाकुरद्वारच्या नाक्याकडे चालली होती. तिच्या डोक्यांत एकच विचार प्रामुख्यानें घोळत होता. आणि तोच तिच्या अभागी जीवाला बेचैन करीत होता. वाटेंत याच विचाराचें ती चिंतन करीत होती.

ठाकुरद्वारच्या नाक्यावरील आपल्या ठराविक जागीं येतांच तिनें भीतीनें आजूबाजूला चांगलें न्याहाळून पाहिलें, आणि अर्धवट समाधानाचा उसासा सोडून आपल्या डोक्यावरील टोपली उतरण्यास सुरवात केली.

इतक्यांत बाजूला बसलेला मारुती भाजीवाला पुढें होऊन म्हणाला, “ म्हातारे, सांभाळ हं ! ”

त्यानें तिची टोपली आपल्या हातांत घेऊन खालीं जमिनीवर ठेवली.

म्हातारीला थोडेसें हलकें वाटलें. आपल्या टापरीनें तिनें तोंडावरील घाम पुसला आणि त्याला आशीर्वाद देत म्हणाली, "देव तुझं कल्याण करो. तुला चांगली बायको मिळेल."

"म्हातारे!" मारुती तिच्या आशीर्वादानें एकदम खूष होऊन म्हणाला, "तुझा पहिला आशीर्वाद ठीक आहे. पण चार दमडया मिळवितां न येणाऱ्या या मारोत्याला बायको कशाला हवीग?"

"अरे जा रे!" म्हातारी खालीं बसतां बसतां म्हणाली, "मारुती काय असाच राहाणार आहे? त्यानें काय हातांत बांगडया भरल्या आहेत?"

म्हातारीच्या या उद्गारांनीं मारुतीला मूठभर मांस अंगावर चढल्यागत वाटलें. त्याचें हें असें दररोज चालत असे. म्हातारीला थोडीशी मदत करावी आणि तिनें भरल्या तोंडानें त्याला वरीलप्रमाणें आशीर्वाद दिला कीं, त्याला मोठा आनंद होत असे. त्यामुळें तो असे प्रसंग वारंवार घडवून आणीत असे.

सगुणा आपल्या जागेवर बसली आणि गिऱ्हाइकांची वाट पहात राहिली. तिचीं गिऱ्हाइकें अगदीं ठरलेलीं होतीं, पण त्यांना यावयास अजून थोडा अवकाश होता. तिच्या ताबडींत सांपडलेलें गिऱ्हाईक क्वचितच दुसरीकडे जात असे. तिचा चेहराच असा होता कीं, तिला कांहींतरी मदत करावी असें वाटावें. कोणालाही त्यामुळें तिला नुकसान असें सहसा येत नसे. त्या दृष्टीनें ती सुखी होती.

परंतु एकच विचार तिच्या मनाला भेडसावीत होता.

म्युनिसिपालिटीची लॉरी आली तर काय करायचें? पळण्याचें सामर्थ्य तिला नव्हतें. इतर भाजीवाले 'लॉरी' आली कीं, भाज्या घेऊन बाजूला होतात आणि 'लॉरी' गेली कीं पूर्ववत् येऊन बसतात. आपण बेकायदेशीर रीतीनें जागेचा उपभोग घेतों, हें फारच थोडया जणांना

कळत होतें. कायदा थोड्याच जणांना कळत असतो. पण कायद्याच्या अज्ञानाबद्दल क्षमा होत नाहीं. त्याचा भंग केला—नकळत कां होईना, कायदेभंग केला तरी शिक्षा ही ठवलेलीच. भाजीवाल्यांचें सुद्धां असेंच असतें. साधारण जाणते पुरुष असत त्यांना हा कायदा कळे, पण पोट त्यांना कायदा मोडायला सांगे. ‘ परवाना ’ काढणें त्यांच्या जिवावर येई. त्या पैशांत आपणांस अमुक अमुक करतां येईल, असें त्यांना वाटे. भाजी विकून मिळायचें तें काय आणि त्यांत असा खर्च केला तर तो अनाठायीं होणार, असें त्यांना वाटे.

साऱ्या गरिबांना असेंच वाटतें. त्यामुळें कायद्याचें उल्लंघन करण्यांकडे त्यांची प्रवृत्ति होते. आणि पुढच्यांच्या पावलावर पाऊल टाकून चालणाऱ्या मागच्यांची तऱ्हा मेंढरासारखी असते. बायाबापड्यांना पैसे भरून परवाना काढून मार्केटांत बसणें अन्यायाचें वाटतें.

आणि एकादे वेळीं ‘ लॉरी ’ च्या तावडींत सांपडून त्यांना धाय धाय रडावें लागतें.

सगुणा म्हातारी याच संकटाला फार घाबरत होती. अजूनपर्यंत तिच्यावर असें संकट आलेलें नव्हतें. आलें होतें, पण ते मारुतीच्या कृपेनें टळलें होतें. मारुती तिचें प्रत्येक वेळीं संरक्षण करीत होता. परंतु स्वतःचें आणि म्हातारीचें संरक्षण करणें त्याला कठीण जात असे. एकदां तर यामुळें त्याची एक भाजीची टोपली ‘ लॉरी ’ नें नेली होती. ती त्याला दंड भरून आणावी लागली.

त्यामुळें सगुणा आज नेहमींप्रमाणें काळजींत होती. ती अजस्त्र अजगरासारखी लॉरी, त्यांतून पटापट बाहेर पडणारीं खाकी वेष धारण केलेलीं माणसें आणि ते आले म्हणजे भाजीवाल्यांची होणारी धांवपळ, त्यांत भाज्यांच्या ढिगानें भरून चाललेली लॉरी—हीं सारीं चित्रें तिच्या अर्धवट आंधळ्या डोळ्यांसमोर उभीं राहून तिच्या जिवाचें पाणी झालें. आधींच वार्धक्यानें कांपणारें तिचें शरीर अधिक कांपूं लागलें.

ती आपल्या विचारांत गुंतली. असें झालें तर काय करावें, मग

आपली उपासमार. मग जगावें कसें ? पती आणि पुत्र यांच्यामागें राहिलेल्या या विधवा म्हातारीनें जगावें कसें, कोणाचा आधार घ्यावा, याचा ती विचार करूं लागली.

तिच्या खांचा झालेल्या डोळ्यांत अश्रू उभे राहिले.

इतक्यांत 'आली, आली,' असा हलकल्लोळ तिच्या कानावर येऊन आदळला. पण तिचे कान तो हलकल्लोळ ऐकण्याला समर्थ नव्हते. इतकी ती आपल्या काल्पनिक दुःखांत गढून गेली होती.

लॉरीचें दुरून दर्शन होतांच सारे भाजीवाले आपआपल्या टोपल्या घेऊन बाजूला झाले धांवपळ सुरू झाली.

लॉरी आली ती थेट म्हातारीच्या समोर उभी राहिली.

दुरून मारुती ओरडला, "म्हातारे, म्हातारे, संभाळ." तिनें मारुतीची हांक ऐकली. पण ती फार उशिरां ऐकली. आणि मारुती धांवत येत होता तो पोंचण्यापूर्वीच सगुणा म्हातारीची हिरवीगार भाजी लॉरीवर दिसूं लागली.

आणि लॉरी निघून गेली.

असहाय सगुणा लॉरी दृष्टीआड होईपर्यंत तिकडे पाहात होती.

ती दृष्टीआड होतांच सगुणा मटकन् खालीं बसली. आणि धायधाय रडूं लागली. मारुती तिचें सांत्वन करूं लागला.

एक दोन भाजीवाल्या बाया आल्या. कोणी तिचें सांत्वन केलें. कोणी तिची निर्भत्सना केली. थोडा वेळ थांबून जो तो आपल्या व्यवसायाला गेला.

सगुणेचीं गिऱ्हाईकें हळहळत परत गेलीं. त्यांना भाजी मिळाली. पण सगुणा दुपारीं उपाशींच राहिली.

❦ ❦ ❦

अत्यंत जड पावलानीं ती घरीं आली. घर कसलें ! मूर्तिमंत दारिद्र्याचें निवासस्थान होतें तें. कुठेंतरी महिना दहा पांच रुपये कमाविणारे दुर्दैवी जीव त्यांत राहात होते. आंतील बाजूच्या एका खोलींत

म्हातारी राहात होती. त्यांच्या शेजारीं एक मोठा बंगला होता. पण त्या बंगल्याशेजारीं आम्हीं राहातों, असें सांगण्यापलीकडे त्यांशीं त्यांचा कांहींएक संबंध नव्हता.

म्हातारी सगुणा आपल्या खोलींत शिरली. खोलींत प्रकाश नांवालासुद्धां नव्हता. डोळ्यांत बोट घातलें तरी गेलें नसतें, इतका दाट काळोख तेथें वास करीत होता. म्हातारी आंत गेली ती एका फाटक्या कांबळीवर आडवी झाली. आपल्या अश्रूंनीं तिनें ती कांबळी भिजवून टाकली.

तिचें सांत्वन करणारें खोलींत कोणीच नव्हतें. पण नाहीं तरी कसें म्हणावें ? मातीच्या मडक्यांत विहार करणारे उंदीर इकडे तिकडे चुळबुळ करीत होते; झुरळें आपल्या मिशा हलवून तिला सहानुभूति दाखवीत होतीं; कोनांत उभारलेल्या जाळ्यांतील कोळी एकाग्रतेनें तिच्याकडे पाहात होता; आणि बाजूला पडलेली मळकट गोधडी आपल्यावर झोंप, अशा अविर्भावानें जणुं तिच्याकडे पाहात होती.

सगुणा रडली. अगदीं पोटभर रडली. आतां रडण्यासारखें शिल्लक कांहीं राहिलें नव्हतें आणि डोळ्यांतील पाणीही आटून गेलें होतें.

रडून झाल्यावर तिनें विचाराला सुरवात केली. आपल्या आयुष्याचा चित्रपट डोळ्यांसमोर उभा करतांना बालपणांतील ते मनोहर देखावे पाहून तिचें मन थोडा वेळ तरी उल्हसित झाल्यावांचून राहिलें नाहीं. पुढें तरुणपणाचा काळ, लग्न झालेलें. आरंभीचे दिवस कांहीं बरे गेलेले. पुढें नवऱ्याला दारूचें व्यसन लागलें. तो गिरणींत मजूर होता. त्याच्या थोडयाशा पगारावर त्यांचें ठीक चाललें होतें; परंतु दारूचा नाद लागतांच तिच्या दुर्दैवाला सुरवात झाली.

एके दिवशीं गिरणीच्या पट्टयांत सांपडून तो मरण पावला.

त्याच्या मृत्यूनें तिला दुःख झालें. पण त्याच्या छळांतून सुटका झाली, याचा तिला आनंदही झाला. त्यामुळें नवऱ्याच्या मरणानें तिला थोडें बरेंही वाटलें.

ती स्वतः गिरणींत जाऊं लागली आणि आपला मुलगा अर्जुन याचें संगोपन करूं लागली.

पुढें अर्जुन मोठा झाला. मोटारचें काम शिकला आणि मोटर ड्रायव्हर झाला. पण तिचें दुर्दैव संपलें नव्हतें. अर्जुनाच्या मोटरला अपघात होऊन तो ठार झाला.

त्याच्या मृत्यूमुळें मात्र तिला अत्यंत दुःख झालें.

त्याचें छिन्नविछिन्न रक्तानें माखलेलें प्रेत तिच्या डोळ्यापुढें उभें राहिलें. तो प्रसंग आतांच घडला आहे, अशा समजुतीनें तिनें किंकाळी मारली. पण तिची किंकाळी स्पष्ट तिच्या तोंडून बाहेर पडली नाहीं आणि मोठ्यानें मारली असती म्हणून कोणाला ऐकूं गेलीच असती, असेंही नाहीं. आणि गेली असती तरी तिकडे लक्ष द्यायला कोणाला फुरसत होती !

त्यामुळें सगुणेच्या किंकाळीनें कोणीही धांवून आलें नाहीं. चुळबुळ करणारा उंदीर मात्र आपल्या बिळांत निघून गेला.

सगुणा मात्र आपल्या विचारांच्या समाधानांतून, स्वप्नांतून उठतात त्याप्रमाणें जागी झाली.

थोड्या वेळानें ती पूर्वस्थितीवर आली. तिला एकंदर स्थितीची जाणीव झाली. तिच्या म्हाताऱ्या मनाला राग आला. चीड आली.

तिनें त्वेषानें आपला पाय जोरानें जमिनीवर हांसडला.

पण पायाखालीं असलेल्या पाण्यानें भरलेल्या मातीच्या घागरीवर तिची लाथ बसून त्याचा चक्काचूर झाला आणि खोलींत पाणीच पाणी झालें.

त्या लाथेनें आपल्या संसाराची धूळधाण करणाऱ्या गिरणीचा आणि मोटारीचा तिनें जणूं सूडच उगविला.

मनाचा कांहींतरी घडा करून ती उठली. पाण्यानें भिजलेलें फाटकें

पुनेर पिळण्याच्या ती भानगडींत पडली नाहीं. किंवा फुटक्या घाग-रीचे तुकडेही तिनें गोळा केले नाहींत.

आपल्या निश्चयासरशीं तिनें आपला मोडका ट्रंक खसकन् ओढला आणि तो उघडून त्यांतून एक पिशवी बाहेर काढली. त्या पिशवींतून एक रुमाल काढून त्याच्या सतरा गांठी सोडायला सुरवात केली.

त्या गांठी सोडवितांना तिला बरेच कष्ट झाले. शेवटच्या गांठींतून कांहीं नाणीं बाहेर पडलीं. तीं एकजात तांब्याचीं होतीं. तिनें भाजी-वाल्याच्या गणितानें ते पैसे मोजून पाहिले. ते अवघे एक रुपया चौदा आणे भरले.

तिनें ते पदराच्या टोंकाला बांधून ठेविले आणि मनाशीं कांहीं दृढ-निश्चय करून ती झोंपी गेली.

त्या ओलसर जागेंतही तिला गाढ झोंप लागली. पहांटेला ती जागी झाली तेव्हां रहदारी नुकतीच सुरू होत आहे असें तिला आढळून आलें.

ती तोंड धुण्याच्या कसल्याही भानगडींत पडली नाहीं. तिनें कांहीं खाल्लें नाहीं. खोलीचें दारही बंद केलें नाहीं. ती तडक बाहेर निघाली.

भाजी-बाजारांत जाऊन तिनें आपल्याजवळ असलेल्या पैशांची भाजी खरेदी केली. आणि नेहमींपेक्षां द्रुतगतीनें ती ठाकुरद्वारच्या नाक्यावर येऊन बसली.

मारुतीनें तिला नेहमींप्रमाणें सलामी देऊन तिची भाजी उतरली.

" म्हातारे मला वाटलं तूं आज येत नाहीं ! "

म्हातारी नुसती हंसली.

तिला हंसतांना अशी मारुतीनें फारच थोडे वेळां पाहिलें होतें. त्यामुळें तिला हंसतांना पाहून त्याला आश्चर्य वाटलें आणि थोडें बरेंही वाटलें. तिची भाजी काल नेली होती. याबद्दल त्याला हळहळ वाटत होती आणि त्या दुःखानें आज म्हातारी येणार नाहीं, असें त्याला

वाटत होतें. असं असतांना ती आली याचा त्याला मनापासून आनंद होत होता.

" म्हातारे, बरीच लबाड आहेस ! नाहीं नाहीं म्हणतां तुझी गांठ बरीच घट्ट दिसते !"

" कसली बाबा गांठ माझी म्हातारीची !"

" मला दत्तक घेतेस का ? नाहीं तरी मी तुझ्या मुलासारखाच तुझ्याशीं वागतों नाहीं ?"

मुलाची आठवण होतांच सगुणेचा चेहरा कावराबावरा झाला. तिच्या डोळ्यांत मारुतीला थोडा खुनशीपणाही दिसून आला, तेव्हां तिच्या मनाला उगाच कष्ट कशाला द्या, अशा विचारानें मारुती पुन्हां कांहीं बोलला नाहीं.

एकामागून एक बाकीच्याही भाजीवाल्या आल्या. कोणी म्हातारीची थट्टा केली. कोणी आश्चर्यानें दृष्टि फेंकली. कोणी सहानुभूति दाखविली.

म्हातारी सगुणा सर्वांशीं हंसून कांहींतरी उत्तरें देत होती. तिला अशी खुषींत पाहून सर्वांना आश्चर्य वाटलें.

हळूहळू गिऱ्हाईकेंही यायला लागलीं. म्हातारीचे डोळे गिऱ्हाईकांच्या आगमनापेक्षां दुसरीकडे कुठेंतरी लागून राहिले होते. तिचें गिऱ्हाईकांकडे लक्ष नव्हतें. तिचीं नेहमींचीं गिऱ्हाईकेंही आलीं.

पण तिनें कोणालाही भाजी दिली नाहीं. तिनें सर्वांना सांगितलें, " दादा, आज भाजी विकायची नाहीं. सगळ्याच भाजीला गिऱ्हाईक मिळालं आहे. विकलेली भाजी पुनः कशी विकूं ?"

तिच्या बोलण्यानें निरुत्तर होऊन गिऱ्हाईकें पुढें निघून जात. अधिक विचारपूस करायला सवड कोणाला होती ?

म्हातारी सारखी कोणाची तरी वाट पाहात होती. मारुतीनें, ' कोणाची वाट पाहातेस ' म्हणून विचारलें, पण तिनें कांहीं उत्तर दिलें नाहीं.

अखेर म्हातारी सगुणा ज्याची वाट पाहात होती ती आली. भाजी बाजारांत चोहोंकडे गोंधळ आणि धांदल उडाली.

'लॉरी'च्या आगमनानें भाजीवाले सावध झाले. त्यांनीं आपापल्या टोपल्या घेऊन स्वतःचें संरक्षण केलें.

त्यांनीं म्हातारीला सावध केलें. पण सगुणा जागची तिळभर ढळली नाहीं.

मारुती तिच्या मदतीस धांवला. त्यानें तिच्या टोपलीला हातसुद्धां घातला. तेव्हां सगुणा ओरडली, "हां, खबरदार! माझ्या भाजीला हात लावूं नकोस!"

मारुती दचकून दोन हात मागें सरला. तिच्याकडे पाहून त्याला अत्यंत विस्मय वाटला.

"म्हातारे, अशी काय करतेस?"

सगुणेनें उत्तरादाखल तोंडावर बोट ठेवून मारुतीला चूप राहण्याविषयीं बजावलें.

इतक्यांत 'लॉरी' येऊन दाखल झाली. लॉरींतील लोक पटापट खालीं उतरले. एकजण म्हातारीकडे धांवला. त्याला तिच्या पुढयांतील भाजी पाहून आनंद झाला. एक सावज मिळालें असें त्याला वाटलें.

त्याने अधाशीपणानें सगुणेच्या भाजीवर झडप घातली.

पण तिची ती क्रुद्ध मुद्रा, तिच्या म्हाताऱ्या डोळ्यांतून बाहेर पडणारा त्वेष आणि राग पाहून तो जागच्या जागीं भेदरून भाजीला हात लावण्यास कचरला. त्याला धीर होईना.

मारुतीही सगुणेचा तो चंडिकेचा अवतार पाहून दचकला.

लॉरीचें कर्कश शिंग वाजलें. तेव्हां भानावर येऊन त्या लॉरीच्या माणसानें कर्तव्यबुद्धीनें सगुणेची भाजी उचलली आणि लॉरींत टाकली.

म्हातारी चिडलेल्या मांजरीसारखी लॉरीकडे धांवली. तिनें त्वेषानें

लॉरीवर लत्ताप्रहार केला. लोखंडाला लोण्यानें मारण्यासारखाच तो प्रकार होता.

लॉरी चालू झाली.

सगुणा पुनः धांवली आणि लॉरीच्यापुढें तिनें आपलें शरीर फेंकलें.

रक्ताच्या चिळकांड्या रस्त्यावर उडाल्या.

तिनें सूड उगविला का—

—१९३४

# कशानें मेली ?



जिवा गाबीत होडींतून खालीं किनाऱ्यावर उतरला आणि हातां-तील वल्हें जमिनीवर टेकून त्यानें चोहींकडे न्याहाळून पाहिलें. झिम्‌झिम् पाऊस पडत होता. मालवणच्या दांडीवरील उक्षेच्या झुडपांची रांग वाऱ्यानें हालत होती. माडाचीं चुडतें एकमेकांवर आदळून आप-टून सळ् सळ् असा आवाज येत होता. सिंधुदूर्गाच्या आसपास कोंकणच्या समुद्रावर दाट धुकें पसरलें होतें. खवळलेल्या समुद्रांतील लाटा खडकावर आपटून त्यांचा प्रचंड ध्वनि उठत होता. एकंदर वाता-वरणांत धुंदता आली होती.

त्याला तो देखावा मोठा उत्साहवर्धक वाटला. कमरेभोंवतीं गुंडा-ळलेलें ओलें फडकें त्यानें पिळलें आणि होडगें किनाऱ्यावर ओढून ठेविलें. थंडीमुळें त्याला हुडहुडी भरली होती, तरी त्याच्या मनांत उद्भ-वलेल्या सुखकारक विचारांनीं त्याला त्याचें कांहीं वाटत नव्हतें.

त्यानें होडींतील जाळें बाहेर काढलें. त्यांत ताजे स्वच्छ पांढुरके मासे चमकत होते. माशांनीं भरलेलें जाळें त्यानें पाठीवर टाकलें, त्याचें टोंक एका हातांत धरून एका हातांत त्यानें वल्हें घेतलें आणि तो चालूं लागला.

दूरवर पसरलेल्या माडांच्या बनांतून धूर येत होता. तिकडे जिवाचें लक्ष गेलें. आणि एका ठराविक झोंपडीवजा घराकडे त्याचे डोळे लागून राहिले.

आज सायंकाळीं त्याची अंजनी माहेराहून यावयाची होती. एका महिन्याचा दीर्घ काळ आज संपून अंजनी येणार, हा विचार त्याला गोड वाटला. तिला खूष करण्यासाठीं वादळी समुद्रांत होडी लोटून त्यानें ताजे मासे पागून आणले होते. आपल्यासाठीं मासे आणलेले पाहून अंजनीला खूप आनंद होईल याचें कल्पनाचित्र तो आपल्या मनापुढें रंगवूं लागला.

सहा महिन्यांपूर्वींचा एक प्रसंग त्याच्या डोळयांपुढें उभा राहिला. या प्रसंगाचें चित्र डोळ्यांपुढें वारंवार उभें करण्यांत त्याला आनंद वाटत असे. देवबागेहून रामनवमीच्या जत्रेनिमित्त कांहीं मंडळी वालावल गांवाला जाण्यास निघाली होती. होडींत अंजनी, तिचे वडील आणि जिवा वगैरे मंडळी होती. वाटेंत नदींत एका ठिकाणीं तोल जाऊन होडी उलटली. सारीं माणसें पाण्यांत पडलीं. पण अंजनी खेरीज सर्व जण पुरुष असल्यामुळें ते पोहत पोहत होडींत बसले, अंजनी बुडाली. साऱ्यांनीं तिच्या शोधासाठीं चोहोंकडे होडी फिरविली. जिवबानें नदींत उडी टाकली आणि थोड्या वेळानें बेशुद्धावस्थेंत असलेल्या अंजनीला एका हातानें धरून तो किनाऱ्याला लागला. कांहीं वेळानें अंजनी शुद्धीवर आली. अंजनीच्या बापानें जिवाचे उपकार मानले.

त्यानंतर अंजनीच्या घरीं जिवा वरचेवर जाऊं लागला. दोघांची ओळख झाली. आणि जिवा घरचा गरीब असूनही अंजनीच्या हट्टामुळें तिच्या बापाला जिवाशीं तिचें लग्न लावून द्यावें लागलें.

दोन्ही वेळां मासे मारून उपजीविका करणाऱ्या जिवा गाबताल अंजनीसारखी रूपवान् बायको मिळाल्यामुळें विलक्षण आनंद व्हावा,

यांत आश्चर्य नाहीं. परंतु गरीब जिवाशीं अंजनीनें स्वतः होऊन लग्न करण्याचा हट्ट घेतला या गोष्टीचा त्याला जास्त अभिमान वाटत असे.

एक महिना झाला. अंजनी माहेराहून परत कधीं येणार, याची जिवा वाट पहात होता, आणि आज नक्की येणार या विचारानें त्याला मनस्वी आनंद वाटत होता. पाठीवरून माशांचें जाळें घेऊन जातांना हेच विचार त्याच्या डोक्यांत वावरत होते.

या विचाराच्या नादांत तो घरीं आला.

पण त्यानें घरीं येऊन काय पाहिलें ?

सायंकाळ होऊन काळोख पडूं लागला होता. या दरम्यान जिवा घरीं आला. त्यानें वल्हें बाहेर टाकलें. माशांचें जाळें हातांत घेतलें आणि चोंहींकडे पाहिलें पण अंजनी त्याला दिसली नाहीं. त्यानें हळूवार पावलांनीं घरांत प्रवेश केला, तों अंजनी जमिनीवर अस्ताव्यस्त पडली असून आपली आई तिला कांहींतरी उपचार करीत आहे, असें त्यांस आढळून आलें.

त्याच्या छातींत धस्स झालें. भीतीनें त्याला आंवढा गिळतां येईना.

त्यानें पुढें होऊन अडखळत विचारलें, " आई, काय झालं ? "

" आता नुकतीच माहेराहून आली. आली तोंच कांहीं वेळानें अशी बेशुद्ध पडली. पाणी कांदा लावला पण शुद्धीवर येत नाहीं. " आईनें उत्तर दिलें.

जिवानें वांकून पाहिलें. तिच्या तोंडाजवळ तोंड नेलें. अंजनीचा श्वास त्याला ऐकूं आला. मेलेली नाहीं या कल्पनेनें त्यानें समाधानाचा सुस्कारा सोडला.

" झपाटलें बाबा. जिवा, हिला कोणीतरी वाटेंत समंधानें झपाटलेलें दिसतें. कुठें तरी भ्याली असेल ती. मोऱ्याच्या धोंड्याजवळील समंध हिच्या अंगावर बसलेला दिसतो. "

इतक्यांत अंजनी झोंपेंतून दचकून उठावें तशी जागी झाली. तिनें चोहोंकडे डोळे गरगरां फिरवून पाहिलें. तिच्या डोळ्यांत जिवाला भीती दिसली.

तिनें सासूकडे आणि नवऱ्याकडे पाहिलें. ताडकन् ती उठून उभी राहिली. तिनें आपल्या मुठी आंवळल्या. दांत करकरां चावले आणि कानठळ्या बसतील अशी एक किंकाळी मारली.

जिवानें पाहिलें. अंजनी जमिनीवर धाडकन् पडलेली होती.

तिच्या आरोळीनें आजूबाजूचे शेजारी धांवून आले.

साऱ्यांनीं ठरविलें कीं, अंजनीला भूतबाधा झाली. जिवालाही पण तसेंच वाटलें. दुसरे दिवशीं पंचाक्षरी आणण्याचें ठरलें.

  

मध्यरात्रींच्या सुमारास अंजनी जागी झाली. लहान मूल पूर्ण झोंप झाल्यावर जसें झोंपल्या झोंपल्याच आजूबाजूचें निरीक्षण करतें तसें तिनें बाजूला पाहिलें.

जिवा तिच्या बाजूस निजला होता. त्याला गाढ झोंप लागली होती. त्याचा तो धिप्पाड देह, शामलवर्ण आणि चेहऱ्यावरील निर्भयता त्या पणतीच्या मंद प्रकाशांतही अंजनीला स्पष्ट दिसली. ती भुकेल्या डोळ्यांनीं त्याच्याकडे पहात राहिली. आजूबाजूला तिनें पाहिलें. आंतल्या बाजूला सासू झोंपली होती.

तिनें उठण्याचा प्रयत्न केला, पण तिला तें साधलें नाहीं. तिला विलक्षण थकवा आल्यासारखें वाटत होतें. तिनें जिवाला ऐकूं जावें, या उद्देशानें म्हटलें, " पाणी ! "

पण तिच्या हांकेला कोणी उत्तर दिलें नाहीं. जिवा घोरतच होता.

कांहींसा विचार मनांत येऊन अंजनी हंसली. काळ्या रात्रीं उमलणारें निशिगंधाचें फूल दिसावें तशी ती हांसली. तिनें हळू हळू उठ-

ण्याचा प्रयत्न केला, आणि तो न साधल्यामुळें ती सरपटत त्याच्याकडे गेली.

त्याच्या अंगाला तिनें आपला हात लावला. पण तो जागा झाला नाहीं. तेव्हां तिनें पुनः त्याच्या गालावर आपल्या उजव्या हाताचा पंजा ठेविला. आतां मात्र जिवाला तो स्पर्श जाणवला. तो एकदम दचकून जागा झाला.

डोळे उघडले तों अंजनी त्याला दिसली. क्षणभर त्याला भीति वाटली. पण तिचा तो सौम्य चेहरा दृष्टीला पडतांच त्याच्या मनांतील भीति विलयाला गेली. त्यानें तिचा हात आपल्या हातांत घेतला आणि तिला जवळ ओढली. अंजनी अत्यंत हळू स्वरांत म्हणाली, " पाणी !"

जिवा उठला. त्यानें वाडग्यांतून तिला पाणी प्यायला दिलें.

" थोडें खातेस का ? "

" नको "

" भूक नाहीं का लागली ? "

तिनें मान हालविली.

" तुझ्यासाठीं आज मी मुद्दाम मासे आणले होते—"

ती हंसली.

जिवाला तिच्या मुखावरील हास्य पाहून बरें वाटलें.

" मग आणूं का थोडा भात ? "

ती उगी राहिलेली पाहून जिवा हळूच उठला आणि जेवण घेऊन आला.

अंजनी जेवली. जेवण झाल्यावर जिवानें तिला विचारलें, " असं काय केलंस तें ? कुठं भ्यालीस का ? "

" नाहीं. "

" मग असं काय झालं ? मोन्याच्या धोंड्याजवळ भ्यालीस ? "

" काय केलं मी ? "

" बेशुद्ध होऊन पडलीस. ओरडलीस. मुठी आवळायला लागलीस. लोक म्हणतात तुला भूत लागलं ! काय होतं तुला ? "

" मला कळत नाहीं कांहीं ! "

" उद्यां पंचाक्षरी आणून दाखवूं का ? "

पंचाक्षरी हे शब्द कानीं पडतांच तिच्या अंगावर शहारे आले.

" काय ? " त्यानें विचारलें.

" नको. मला कांहीं होत नाहीं. असंच पूर्वी एकदां झालं होतं. मला भूत लागलेलं नाहीं. "

" बरं, नाहीं आणणार ! "

" शपथ आहे माझी आणाल तर. मला भीती वाटते. "

" भिऊं नकोस. नाहीं आणत. पण दाखवलं तर कळेल काय होतं तें ? "

" वैद्याला आणा हवं तर. "

" बरं. तसंच करतों. "

  

अंजनी बरी झालेली पाहून दुसरे दिवशीं सर्वांना बरें वाटलें. पण कांहीं झालें तरी अंगांत असलेला समंध पुनः तिला त्रास देऊं लागणार म्हणून पंचाक्षरी आणून मंत्रतंत्रानें त्याचा बंदोबस्त करून टाकावा, हें बरें, असा सर्वांनीं जिवाला सल्ला दिला.

जिवाची आई तर त्याच्या पाठीसच लागली.

" आई, पंचाक्षरी आणण्यापेक्षां वैद्याला दाखवावी. औषधानें गुण येईल. " जिवा म्हणाला.

" डोंबल तुझं. अरे, एवढया मोठया समंधापुढें तुझा वैद्य मेला काय करणार ? त्याला पंचाक्षरीच हवा. चांभाराच्या देवाला खेटराचीच पूजा हवी. " आईनें उत्तर दिलें.

सगळ्यांनीं जिवाची थट्टा केली. आणि पंचाक्षरी आणण्याबद्दल

टुमणें लाविलें. जिवाला अंजनीनें घातलेल्या शपथेची आठवण झाली, त्यामुळें तो पंचाक्षरी आणण्याचें लांबणीवर टाकूं लागला.

अंजनी त्याला विनवित होती कीं, पंचाक्षरी आणूं नका. जिवाला त्यामुळें कांहींच करतां येत नव्हतें.

❦ ❦ ❦

यानंतर तीनचार महिन्यांत सगळे व्यवहार सुरळीत चालले होते. अंजनीला पुन्हां कांहीं भूतबाधा झाली नाहीं. यामुळें पंचाक्षरी आणण्याचें बोलणें तसेंच राहिलें.

एके दिवशीं अंजनी मालवणच्या बाजाराहून मासे विकून घरीं येत होती. जिवाही तिच्या बरोबर होता. घर थोडें जवळ राहिलें होतें. इतक्यांत अंजनी वादळांत सांपडलेल्या फोपळीसारखी धाडकन् वाळूंत पडली. तिनें मुठी घट्ट आंवळून घेतल्या होत्या. जिवा धांवला. त्यानें तिला उठविली. ती उठली. आणि इकडे तिकडे पाहून एकदम वेगानें पळत सुटली. ती घरीं आली. जिवाही तिच्या मागोमाग पळत आला. त्यानें तिला धरलें. अगदीं घट्ट पकडून ठेविलें.

सगळे जण जमा झाले.

आतां जो तो जिवाला दोष देऊं लागला. पंचाक्षरी आणून या पूर्वीच अंजनीच्या अंगावरील समंध काढून टाकला असता तर हा प्रकार घडताना असें ते म्हणूं लागले.

जिवाचें मन डळमळूं लागलें. अंजनी भूतबाधेपासून मुक्त व्हावी यासाठीं वाटेल तें करायला त्याची तयारी होती. पंचाक्षरी आणावा, असें त्याला वाटूं लागलें. पण तिनें शपथ घालतांना केलेला केविलवाणा चेहरा आठवून त्याचें पाऊल घरांतून बाहेर पडेना.

तेव्हां जिवाच्या आईनें दुसऱ्या एका इसमाला पंचाक्षरी आणण्यास पाठवून दिला.

तो दिवस कांहीं अंजनी शुद्धीवर आली नाहीं. क्वचित् मधून मधून तिची सूक्ष्म हालचाल दिसे, त्यामुळें जिवाच्या जिवांत जीव येई.

तिन्हीसांजा कातरवेळेला पंचाक्षरीबुवा जित्राच्या घरीं येऊन दाखल झाले.

  

अंगांत काळें जाकीट, डोकीला तांबडा रुमाल असलेला, घाणेरडा मळकट पंचा नेसलेला, उग्र चेहऱ्याचा आणि पिंगट मिशांचा तो पंचाक्षरी पाहून जिवाला शिसारी आली.

त्यानें आपल्याबरोबर शेंदूर, लिंबू, टांचण्या, मिरच्या वगैरे सामुग्री आणली होती. शिवाय त्याच्याजवळ एक वेताची काठीही होती. त्यानें आपलें आसन बाहेर ठोकलें. इतर मंडळीला बाहेर लावून देऊन फक्त निवडक चार माणसें आपल्याबरोबर ठेविलीं.

आणि आपल्या मंत्रतंत्रांना सुरवात केली. मंत्र म्हणतांना त्याचा तो आवेश आणि भीषण चेहरा पाहून जिवाला कसेसेंच वाटलें.

पंचाक्षऱ्यानें आपले विधी केले. आणि अंजनीजवळ जाऊन तिच्या अंगावर शेंदूर आणि तांदूळ फेंकले. तरीही ती जागी होत नाहीं, असें पाहून आपल्या हातांतील वेताच्या काठीनें अंजनीच्या पाठीवर त्यानें प्रहार केला.

तो प्रहार जिवाच्याच जणूं हृदयावर बसला. तो त्वेषानें पुढें होणार तों अंजनी दचकून ओरडत उभी राहिली.

तिनें पाहिलें. पंचाक्षरी तिच्या दृष्टीस पडतांच भीतीनें ती थरथर कांपूं लागली.

इतक्यांत बाजूचे लोक कुजबुजले, "पाहिलात पंचाक्षरीबुवांचा तडाखा ? भूत त्याना घाबरलें. पहा कसें थरथर कांपत आहे तें !"

तिच्या डोळ्यातील भीति, तिनें जिवाकडे फेंकलेली करुण दृष्टि आणि तिच्या पाठीवर उठलेला वेताच्या काठीचा तांबूस वळ पाहून जिवाच्या काळजाचें पाणी पाणी झालें.

त्याचें सर्वांग घामानें डंवरून गेलें.

पंचाक्षरी दरडावून विचारूं लागला, “ बोल तूं कोण आहेस ? इथें कशाला आला आहेस ?”

पण दचकण्यापलीकडे तिनें कांहीं उत्तर दिलें नाहीं.

तिला पुनः पुनः तोच प्रश्न करण्यांत आला तरीहि उत्तर मिळालें नाहीं. तेव्हां पंचाक्षरी फारच चिडला. गुंजेसारखे लाल डोळे करून त्यानें आपली काठी सरसावली.

“ हां, खबरदार!” असे शब्द जिवा बोलला; पण ते त्याच्या तोंडांतून बाहेर व्यक्त झाले नाहींत. पंचाक्षऱ्याचा तो आवेश पाहून जिवा थिजून गेला होता.

त्या वेताच्या काठीनें अंजनीच्या पाठीवर सपासप तडाखे दिले जात होते; आणि प्रत्येक प्रहारागणिक “ बोल, तूं कोण आहेस ? ” असें पंचाक्षरी विचारीत होता.

अंजनी किंकाळ्यांनीं त्याला उत्तर देत होती.

शेवटीं तिला ओरडताही येईना. ती गलित झाली; घामानें ती भिजून गेली. आणि तिनें जिवाकडे ओझरती दृष्टि टाकून जमिनीवर अंग टाकलें.

तेव्हां मात्र जिवा धांवला. त्यानें त्वेषानें पंचाक्षऱ्याच्या अंगावर लाथ हाणली. परंतु त्याची लाथ बसण्यापूर्वीच तो कोलमडून खालीं पडला.

दोघे चौघे धावले. त्यांनीं जिवाला धरून घरांत नेलें.

पंचाक्षरी तरीहि निराश झालेला नव्हता. अंजनीच्या अंगावरील भुताला बोलतें करण्याचा त्याचा निश्चय कायम होता. आजूबाजूच्या दहा बारा मैलांच्या टापूंत उत्कृष्ट पंचाक्षरी म्हणून त्याची ख्याति होती. आजपर्यंत शेकडों भुतें त्यानें वाटेला लाविलीं होतीं, अशा दंतकथा सांगण्यांत येत असत. प्रत्यक्ष अनुभव आलेला नसला तरी ही कीर्ति प्रत्येकजण श्रद्धायुक्त अंतःकरणानें सांगत असे.

सगळे उपाय संपल्यावर मिरच्यांची धुरी देण्याचा पंचाक्षऱ्यांचा सांप्रदाय असतो. तोच उपाय अंजनीच्या बाबतींत करण्याचें पंचाक्षऱ्यानें ठरविलें.

  

एका अंधाऱ्या खोलींत अंजनीला नेऊन ठेविली. त्या मंत्र्यानें एका भांडयांत विस्तव करून त्यांत मिरच्या टाकल्या. त्याबरोबर चोहींकडे धूरच धूर झाला. "बोल तूं कोण आहेस ? इथून जातोस कीं नाहीं ?"

उत्तर आलें नाहीं.

तेव्हां त्याला भयंकर चीड आली. त्यानें खोलीचा दरवाजा खाडकन् बंद करून घेतला आणि ओरडला, "आतां कसा जात नाहींस तें पहातों !"

मिरचीच्या धुरानें अंजनी जागी झाली. जागी झाली पण ती गुदमरली. तिला श्वासोच्छ्वास करतां येईना. तिला ओरडतां येईना. धुराच्या दाटींत तिला मार्ग दिसेना. ती तशीच मूर्च्छा येऊन पडली.

  

जिवा पहांटेला जागा झाला. पहांटेचा गार वारा सुटला होता. जाग आल्याबरोबर त्याला अंजनीची आठवण झाली.

तो तांतडीनें उठला. घरांत सर्व ठिकाणीं त्यानें अंजनीचा शोध केला. शेवटीं तो अंजनी आंत असलेल्या खोलीजवळ गेला. त्यानें खोलीचा दरवाजा उघडला. उघडल्याबरोबर त्याला मिरचीच्या धुराचा खोकला आला.

त्याच्या हृदयांत कुशंकेचा चरका बसला. त्यानें अधीऱ्या दृष्टीनें चोहींकडे पाहिलें. अंजनी जमिनीवर निजली होती.

जवळ जाऊन त्यानें अत्यंत प्रेमानें तिच्याकडे पाहिलें आणि अतिशय मृदु स्वरांत हांक मारली, "अंजना, अंजू ?"

पण अंजनी त्याला ओ देण्यास जागी नव्हती. तिला गाढ झोंप लागली होती.

त्यानें पुनः हांक मारली.

तरीही ती जागी झाली नाहीं. म्हणून त्यानें तिला हळूवार हातानें हालविली.

हाताला विजेचा झटका बसून हात झटकन् मागें घ्यावा तसा त्यानें तिला लावलेला हात मागें घेतला.

तिचें अंग त्याला बर्फापेक्षांही थंडगार लागलें. भीतीनें तो मनांत चरकला. मनांत आलेला संशय खरा कीं खोटा तें ठरविण्यासाठीं त्यानें तिचें बाजूला वळलेलें तोंड आपल्याकडे केलें.

निर्जीव वस्तूला हालवावें तशी ती हालली. पहांटेच्या अंधूक प्रकाशांत तिचे मिटलेल डोळे, विलग ओंठ आणि गळलेल्या पानाची मलूलता त्याला दिसलीं.

त्यानें तिच्या गालावर आपल्या हाताचे पंजे ठेविले. तिचे गाल त्याला मऊ मऊ आणि गार गार लागले.

—१९३४

# स्त्री आणि पुरुष



"मालवण, १० जानेवारी १९XX

'कुठूनं ही रोजनिशी लिहायुची ब्याद मागें लावून घेतली असं होऊन गेलंयु मला. रोज आपलं लिही लिही लिही. आणि दुसऱ्याच्या नजरेस पडूं नये म्हणून कोण जपावं लागतं! दिवसा लिहायची सोयच नाहीं मुळीं...हो, पण काय करायचं इतर भाकड कथांशीं!—आज आमच्या वर्गात मॅट्रिकचा वर्ग पाहायला मुंबईचे एक बडे प्रोफेसर आले होते. आम्हां विद्यार्थ्यांविषयीं त्यांना मोठी कळकळ दिसली. ते हरतऱ्हेचे प्रश्न विचारीत होते. जातां जातां त्यांनीं मुलांना, तुमचं आयुष्यांतील ध्येय काय, असा प्रत्येकाला प्रश्न केला. पुष्कळांना उत्तर देतां आलं नाहीं. कांहीं जणांनीं कशीं तडातड उत्तरं दिलीं. कोणी आयु. सी. एस्. होणार म्हणून सांगितलं, कोणी प्रोफेसर, वकील, डॉक्टर, इंजिनियर, मास्तर, देशाचा पुढारी, समाजसेवक होणार अशीं निरनिराळीं उत्तरं दिलीं.

मला वाटलं होतं माझ्यावर पाळी येणार नाहीं म्हणून. मी असावध होतें. इतर मुलांच्या उत्तरांनीं मला मोठी गंमत वाटत होती. शेवटीं त्या प्रोफेसरांची दृष्टी माझ्याकडे वळली. त्याबरोबर माझ्या पोटांत धस्स झालं. त्यांनीं प्रेमळपणानं हंसून माझ्याकडे पाहिलं. त्यामुळें सारे विद्यार्थी आणि मास्तर यांचं लक्ष माझ्याकडे लागलं आहे असा मला भास झाला.

“ आपण काय ध्येय ठरवलं आहे ? ” प्रोफेसरांनीं माझ्याकडे हंसत हंसत पहात विचारलें.

माझ्या अंगांत वीज चमकून गेली. माझे हात पाण्यानें भिजून गेल. मी अगदीं गोंधळून गेलें. हा प्रश्न माझ्या आतांपर्यंतच्या आयुष्यांत कधींच उद्भवला नव्हता. आपला अभ्यास आणि आपण या पलीकडे कांहीं असतं याची मला जाणीव नव्हती. त्यामुळें भांबावल्यासारखी माझी स्थिति झाली. त्या गोंधळांत मी कशीबशी उभी राहिलें. सर्वांचे डोळे माझ्या उत्तराकडे लागून राहिले होते. आमचे हेडमास्तर भाऊ-साहेब आजगांवकर माझ्याकडे, मी काय उत्तर देतें म्हणून कौतुकानं पहात होते. त्यांनीं मानेनें मला धीर दिला. माझी घाबरलेली स्थिति पाहून प्रोफेसरही म्हणाले, “ घाबरूं नका. सावकाशीन उत्तर द्या ! ”

मी खालीं मान घालून दोन तीन मिनिटें उभी होतें. मला कांहीं उत्तर देतां आलं नाहीं. अभ्यासाच्या प्रश्नांचीं उत्तरं तडातड देऊन विद्यार्थ्यांना लाजविणारी मी मुकी झालें. सारे प्रश्न पुस्तकांत होते. पण हा प्रश्न पुस्तकांत नव्हता.

शेवटीं माझी असहाय, केविलवाणी स्थिति पाहून प्रोफेसरांनीं मला बसायला सांगितलं. मी बसतां बसतां कोणीतरी विद्यार्थी माझ्या मागून हळूच पुटपुटला, “ बायकांचं ध्येय लग्न करणं ! ”

“ हो, खरंच, लग्न करणं एवढंच का बायकांचं ध्येय असतं ? ”

  

मालवण, ११ जानेवारी १९++

‘......सारखा विचार करतें आहे. पण मला कांहीं सुचत नाहींसं झालं आहे. माझा केवढा अपमान झाला शाळेंत. मला उत्तर देतां आलं नाहीं. मुलांना ज्या प्रश्नाचं उत्तर देतां आलं त्याचं मुलीला कां देतां येऊं नये ? बायकांना ध्येयच नसतं का ? आणि ध्येय म्हणजे तरी काय ? मला कुठं ठाऊक आहे ध्येय म्हणजे काय तें !......

〜〜〜〜〜〜〜〜〜〜〜〜〜〜〜〜〜〜〜〜〜〜〜〜〜〜〜〜〜〜〜〜

.......परवां विनूदादाचं मुंबईहून कॉलेजांतून बाबांना पत्र आलं, त्यात सुद्धां तो लिहितो, ‘ डॉक्टर व्हायचं असं माझं ध्येय मी कित्येक वर्षांपासून ठरवलं आहे. ’ आईला पत्र वाचून दाखवतांना, त्याच्या मनाप्रमाणेंच त्याला डॉक्टर करूं, म्हणून त्याच्या ध्येयाचं बाबांनीं कौतुक केलं. एकंदरींत काय ध्येय म्हणून कांहींतरी आहेच. माझं ध्येय काय असेल बरं ! लग्न करणें ?...इश्श् ! कांहीं तरीच...... बाबांना उद्यां विचारलं पाहिजे माझं ध्येय काय तें ? ’

  

मालवण, १२ जानेवारी १९ + +

‘ .......सकाळीं चहा घेतांना मी बाबाना शाळेंतील हकीकत सांगून माझं ध्येय काय म्हणून विचारलं. माझा प्रश्न ऐकून ते मोठ्यानं हंसले. आई जवळच बसली होती. तीही माझ्याकडे पाहून हसूं लागली. ती चटकन् म्हणाली, “ लग्न करून संसार सुखाचा करणं हेंच बायकांचं ध्येय बरं ! ”

बाबा म्हणाले, “ तुझं ध्येय काय तें तुझ्या आईलाच विचार. ती तुला सारं समजावून सांगेल. ” बाबांशीं बराच वाद केला. पण त्यांना माझं म्हणणं मला पटवून देतां आलं नाहीं. जिथं ध्येय म्हणजे काय हें, घोडा घोडा म्हणतात तो हा असं ऋषि कुमारांप्रमाणें, मला कोणी पटवून दिलं नव्हतं, तिथं मी माझी बाजू मांडून तरी कशी दाखविणार ! मला बाबांचं एक मोठं आश्चर्य वाटतं. विनू दादाच्या ध्येयाबद्दल जे बाबा कौतुक करतात ते माझ्या प्रश्नाचं सरळ उत्तरही देऊं इच्छित नाहींत, असा पक्षपात कां करावा त्यांनीं. मला वाईट वाटलं तें याच गोष्टीबद्दल.

आईला याबद्दल विचारलं मी. ती म्हणाली, “ लली, तूं मुलगी आहेस. दुसऱ्याच्या घरीं जाऊन नांदणार. आणि विनू मुलगा आहे.”

बाबा शेवटीं उठून जातांना म्हणाले, “ ललितेला आतां असं सुंदर ध्येय आणून देतों कीं, तिनें ध्येयाबद्दल पुनः बोलूंच नये ! ”

मला त्यांच्या बोलण्याचा अर्थ स्पष्टसा कळला नाहीं. पण आईला त्यांच्या बोलण्यानं आनंद झाल्यासारखा दिसला. त्यावरून लग्नासंबंधीं कांहींतरी असावं असा माझा तर्क झाला. कारण आईला अलिकडे या गोष्टी फार प्रिय झालेल्या दिसून येऊं लागल्या आहेत.

बाबांनीं मला अगदींच गोंधळांत पाडलं आहे. त्यांनीं माझी शंका निरसन केली नाहीं. उद्यां मास्तरांनाच विचारलं पाहिजे दुपारच्या सुट्टींत............'

  

मालवण, १३ जानेवारी १९++

'......आज माझ्या मनांत प्रकाश पडला. माझ्या जिवावरचं एक जड ओझं नाहींसं झाल्यासारखं वाटत आहे मला. पण एक नवीन ओझं येऊं पहात आहे. भाऊसाहेबांनीं मला सर्व समजावून सांगितलं. परवां घाबरल्याबद्दल माझी थट्टा केली. पुरुषाप्रमाणं बायकांनाही कांहींतरी आयुष्याचं ध्येय असावं—असतं, चूल आणि मूल एवढीच त्याची मर्यादा नाहीं, असं त्यांनीं मला सांगितलं.........माझं काय बरं ध्येय असेल.........?'

  

मालवण, २० जानेवारी १९++

'...गेला संबंध आठवडा विचारांत घालविला. माझं ध्येय मी शोधीत होतें. सारे धंदे डोळ्यांपुढें उभे राहिले. डॉक्टर, मास्तर, नर्स हीं ध्येयं मला नाहीं बरीं वाटत. मला तर असं वाटूं लागलं आहे कीं, ध्येय सांगणं ही एक फुशारकीची गोष्ट आहे. सारेजण स्वतःच्या बडे-जावाशिवाय दुसऱ्या कसल्याही गोष्टीकडे पहात नाहींत. भाऊसाहेब काल म्हणाले, "माणसाचं ध्येय असं असावं कीं, गरीब, अनाथ आणि दुबळे यांच्यासाठीं त्याचा उपयोग व्हावा. असे किती डॉक्टर दाखवितां येतील कीं, ते गरिबांना फुकट औषध देतात. शुश्रूषा करून

रोग्याला आराम प्राप्त करून देणं हें नर्सीचं ध्येय, पण सगळ्यांचं पैशामुळं अडून बसतं. प्रत्यक्ष व्यवहारांत ध्येयाची विस्मृतीच माणसांना फार होते. स्त्रियांनीं असंच ध्येय आपल्यापुढं ठेवावं कीं, आपल्या जातीची वकीली त्यांना जगापुढं करतां येईल."

हो, त्यांचं हें शेवटचं वाक्य माझ्या कानांत सारखं गुणगुणत आहे. स्त्रियांची वकीली करायची म्हणजे काय करायचं ? त्यांच्या हक्कासाठीं समाजाबरोबर, सरकारबरोबर झगडायचं हेंच कीं नाहीं ? कोणत्या मार्गानं हें ध्येय मला साध्य करतां येईल ?......वकील झालं तर ? छे ! पण बायका कुठं वकील असतात ? नसायला काय झालं. असतात कुठं कुठं. पुण्यामुंबईकडे आहेत म्हणतात कांहीं. कितीतरी विधवा, असहाय स्त्रिया, अजाण कुमारिका पुरुषांच्या ओंजळीनं पाणी प्यावं लागल्यामुळें त्यांना योग्य न्याय मिळत नाहीं. उद्यां बायका वकीली करूं लागल्या तर त्यांना केवढा आधार वाटेल !......

...हो, मला वकीलच झालं पाहिजे. आणि तेंही अगदीं लवकर. मॅट्रिक झाल्याबरोबर ताबडतोब ॲडव्होकेटच्या परीक्षेला बसायचं. बाबांना तसं चक्क सांगून टाकणार मी. म्हणावं बायकांनाही ध्येय असतं. आहा ! किती मला बरं वाटूं लागलं ! कांहींतरी चांगली गोष्ट करीत आहें असं मला वाटतंय्. '

❦ ❦ ❦

मालवण, २१ जानेवारी १९++

' आजही सकाळीं चहाच्या वेळींच बाबांना सांगितलं.

" बाबा ! " मी म्हणालें, " मी माझं ध्येय नक्की ठरवून ठेवलंय् बरं का ! "

" असं ? " किंचित् चेष्टेच्या स्वरानें त्यांनीं प्रश्न केला.

" हो. "

" काय ठरवलंस ? ऐकूं तर खरं."

“ मी वकील व्हायचं ठरवलं आहे. चार महिन्यांनीं मॅट्रिक झाल्यावर मी मुंबईला मावशीकडे राहून वकीलीचा अभ्यास करणार !”

माझं बोलणं ऐकून बाबा चकित झाल्याशिवाय राहिले नाहींत. आई कांहींतरी अनिष्ट बातमी ऐकल्याप्रमाणें चेहरा करून बावरल्यासारखी माझ्याकडे पाहात होती.

थोडया वेळानें बाबा उठले. त्यांच्या चेहऱ्यावर हास्यभाव दिसत होता. कोटाच्या खिशांतून त्यांनीं एक पत्र बाहेर काढलं आणि माझ्या हातीं देत म्हटलं, “ हें घे तुझं ध्येय !”

तें पत्र फोडलेलेंच होतें. मी तें उघडून वाचलं. तें मामाचं पत्र होतं. माझ्या लग्नासंबंधीं लिहिलं होतं. त्यांत एक स्थळ सुचविलं आहे. नवरा मुलगा मुंबईत नुकतीच वकीली करीत आहे. लवकरच बॅरिस्टर होण्यासाठीं त्याचं परदेशीं जाण्याचंही ध्येय आहे.

“ पहा, अनायासं तुला वकीलीण व्हायला मिळत आहे.” बाबा थट्टेनं म्हणाले, “ तुझं ध्येय इतक्या लवकर साध्य होईल याची तुला कल्पना सुद्धां नसेल ! कुरकूर करायला तुला जागाच ठेवलेली नाहीं. ”

मला त्यांचं बोलणं नाहीं आवडलं.

“ मला खरीखुरी वकीलीण व्हायचं आहे. दुसऱ्यांच्या नांवावर मोठेपणा मिरवायला नको. ” मी किंचित् रागानं उत्तरले.

माझं ध्येय निवडण्यांत स्त्रीवर्गाची सेवा करण्याचा माझा इरादा आहे वगैरे त्यांना मी पुष्कळ समजावून सांगितलं. पण माझं सांगणं त्यांना उद्धटपणाचं वाटलं. ते रागांत—घुश्श्यांत होते. मी रडलें. लहान मूल ‘ हो हो ’ करून रडतें तसें रडलें. बाबा बाहेर उठून गेले, आईनें मला जवळ घेतलं. आजचा सारा दिवस मला बेचैन गेला. मला अजूनही कांहीं सुचेनासें झालें आहे. शाळेंत कशाकडेही लक्ष नव्हतं.

बाबांच्या नजरेला नजर भिडविण्याचं धैर्य आज मला झालं नाहीं, मी त्यांना आणि ते मला टाळीत होतों, बोलण्याचा प्रसंग आलाच नाहीं. ’

  

मालवण, २५ मार्च १९++

'......बाबा पूर्वीप्रमाणें माझ्याशीं बोलतात तरी पूर्वीसारखा मोकळेपणा राहिलेला नाहीं. त्यांच्या मनांत अजूनही अढी आहेच. आमची प्रिलिमिनरी झाली. मी पास झालें. फॉर्म मिळाला. आतां परीक्षेला थोडे दिवस राहिले. मुंबईला मावशीकडे उतरायचं असं ठरवलं आहे......

......आज आईनं मध्यस्थी करायला सुरवात केली आहे, बाबांचं म्हणणं असं कीं, मी अगोदर लग्न करावं. नवरा मुलगा सुविद्य आहे—वकील आहे. त्यानं दिली परवानगी तर हो खरीखुरी वकिलीण, आमचं काय जातं...बाबासारख्यांना माझे विचार पटायचे नाहींत. पण त्यांनीं सुचविलेली तोड अगदींच वाईट नाहीं. मुलगा तरुण आहे, चांगला शिकलेला, हल्लींच्या काळांतला आहे. बायकोनं वकीली करूं नये असं त्याला वाटणार नाहीं. सध्यांच्या काळांत तरुण माणसं कोत्या विचाराचीं असणार नाहींत. मग त्यांची तोड मी कां मान्य करूं नये? माझं ध्येय तरी या मार्गानं साध्य होईल. 'ते' परवानगी खात्रीनं देतील असं वाटतं. व्हावं झालं कबूल...उद्यां आईला सांगूनच टाकतें कीं, तुमची कल्पना आपल्याला पसंत आहे म्हणून. मात्र त्यांनीं माझ्यासाठीं त्यांच्याकडे खटपट करायला हवी.

माझं ध्येय साध्य होणार एकूण तर!'

  

मुंबई, १५ जुलै १९++

'...माझा जीव गुदमरल्यासारखा झाला आहे. त्यांच्या बोलण्याकडे माझं कधीं कधीं लक्षसुद्धां नसतं. 'वकीलीणबाई, वकीलीणबाई' म्हणून मला सारीं हांक मारतात. अशा वेळीं माझ्या हृदयाला हजारों विंचू डसल्याप्रमाणें वेदना होतात. मला माझ्या ध्येयाचा विसर पडत नाहीं. त्यांना विचारावं असं एकसारखं वाटत असतं पण धीर होत नाहीं. बाबाप्रमाणं हे सुद्धां मला झिडकारून लावतील अशी उगाच भीति

वाटते. माझ्या पुढील शिक्षणाची सोय करण्याची खटपट करीन असं वचन देऊन बाबांनीं लग्न करीन असं माझ्याकडून कबूल करून घेतलं आणि आतां ते ती गोष्ट विसरूनच गेल्याप्रमाणं वागतात......

...यांचा प्रेमळ, हौशी स्वभाव पाहून मला आशा वाटते. आतां विचारलं हें पाहिजेच. मला अभ्यासाला लागायचं आहे. त्यांनीं मनांत आणलं तर ते एका वर्षांत माझा अभ्यास पुरा करून घेतील. दीड दोन वर्षांनीं यांच्याबरोबरीनं मी कोर्टांत बसेन. आम्हीं बरोबरच कोर्टांत जाऊं. अहा ! किती सुखकारक कल्पना ही ! पण ती पुरी करणं त्यांच्या हातीं आहे. उद्यां विचारावंच त्यांना. त्याशिवाय माझ्या मनाची तळमळ शांत होणार नाहीं...'

  

मुंबई, १६ जुलै १९++

'...त्यांना विचारलं. त्यांनीं माझी अतिशय थट्टा केली. पहिल्यानं मी सारं हें गंमतीनं सांगत आहे अशीच त्यांची समजूत झाली, आणि त्यामुळें त्यांच्या थट्टेला ऊत आला होता. ते म्हणाले, " मी इतकीं वर्षें हाडाचीं काडं केलीं तेव्हां कुठं या दर्जापर्यंत येऊन पोंचलों. तुम्हां बायकांचं एक बरं, लग्न झालं कीं नवऱ्याची पदवी आपोआप तुमच्याकडे धाव घेते. या फुकट पदवीबद्दल आजपर्यंत कुणीही कुणावर खटला केलेला नाहीं. "

या विनोदाचं मी कौतुक केलं नाहीं. " थट्टेनं नाहीं सांगत मी ! " मी गंभीरतेनें सांगितलं " खरोखरच मालवणला हायस्कुलांत असतांना मी असं ध्येय ठरवलं होतं. लग्न करण्याचा सुद्धां विचार नव्हता; पण बाबांपुढं माझं कांहीं चालेना. शेवटीं तुम्ही तरी माझं म्हणणं ऐकाल अशा आशेवर लग्नाला कबूल झालें ! "

मी त्यांना शाळेंतील प्रोफेसरांनीं विचारलेल्या प्रश्नापासून माझ्या मनांत कशी क्रांति झाली, आणि त्यानंतर स्त्रीवर्गाची सेवा करण्यासाठीं

वकील व्हायचं ध्येय कसं ठरवलं, याची माहिती करून दिली. " मग करूं ना सुरवात ! " मी लडिवाळपणानं विचारलं.

त्यांची मुद्रा कमालीची गंभीर झाली होती. किंचित् रागीटपणाची छटाही तीवर दिसत होती.

रुक्ष स्वरांत ते उद्‌गारले, " बायकांना ध्येय नसतं समजलीस. असलंच तर पती हेंच स्त्रीचं ध्येय ! "

त्यांच्या उद्‌गारांनीं मी केवढ्यानें तरी दचकलें. माझ्या आशेच्या गुलाबाच्या पाकळ्या गळून गेल्या. माझ्या मनाला मोठा धक्का बसला. माझ्या डोळ्यांतून अश्रु वाहूं लागले.

कितीवेळ तरी आम्हीं मुक्याच्या स्थितींत होतों. रडून माझ्या डोळ्यांतलं पाणी सुकून गेलं.

माझी ती स्थिति पाहून त्यांना दया आली माझी. ते माझ्याजवळ आले. मला त्यांनीं जवळ घेतलं, आणि समजाविण्याच्या स्वरांत ते म्हणाले, " खुळी कुठली ! ललिता, हें वेड सोडून दे बरं ! "

" मी खरोखरच वेडी का ? "

—१९३४

# पूर्वजन्मींचे वैरी



श्रीरंग आपल्या वधूचें दर्शन घेण्यासाठीं डोळे लावून सारखा पहात होता. आपली आपली बायको कशी आहे, ती गोरी आहे कीं काळी आहे, तिचे अवयव नीटस, रेंखीत आहेत कीं नाहींत, तिचें तोंड फुलासारखें आनंदमय आहे कीं, दुर्मुखलेलें आहे, इत्यादि तरुण मनाला बेचैन करणारे प्रश्न मनांत उत्पन्न होऊन तो तिला पाहण्याची संधी शोधीत होता. पण घटका भरल्याशिवाय ती त्याला दिसणार कशी ? आणि म्हणूनच उत्कंठित मनानें तो अंतरपाटाकडे आणि ओझरत्या दिसणाऱ्या तिच्या केशभूषेकडे टक लावून पाहात होता.

घटका भरतांच शेवटचें ‘ शुभ मंगल सावधान ’ होऊन दोन अनोळखी माणसांमधला अंतरपाट दूर झाला. परस्परांच्या दर्शनासाठीं उत्सुक झालेल्या डोळ्यांचें क्षणमात्र मीलन झालें आणि वधूवरांनीं विवाहमाला परस्परांच्या गळ्यांत घातली.

इकडे वधूच्या मनांत तरी काय कमी गडबड उडाली होती ! पण पुरुषाप्रमाणें वर मान करून पाहाण्या इतकें धैर्य तिच्यांत कुठून असणार ? तिनें जी एकदां खालीं मान घातली ती अखेरपर्यंत. माळेशीं चाळे करीत ती अंतरपाटाखालून दिसणाऱ्या श्रीरंगाच्या पायाकडे पाहात होती. ते पाय चांगले दणकट असून त्याचीं स्वच्छ गोरीं पाउलें पाहून तिच्या हृदयांत दुरदुरून आलें. तीं पाउलें आपल्या मालकीचीं आहेत याचा तिला अभिमान वाटला.

अंतरपाट दूर झाल्यावर श्रीरंगानें पाहिलें तों त्याच्या कल्पनेपलीकडे ती सुंदर असल्याचें त्याला आढळून आलें. तिच्या ठेंगण्या बांध्याला पिवळें पातळ खुलून दिसत होतें. त्यापेक्षां तिचा केतकीसारखा सुवर्ण वर्ण त्याला मोहक वाटला. तिनें आपले विपुल केश पाठीवर मोकळे सोडले होते आणि निवडकच दागिने अंगावर घातले होते.

तिनें श्रीरंगाकडे जेव्हां हळूच चोरून दृष्टी फिरविली तेव्हां तिच्या डोळ्यांचें तेज श्रीरंगाला अलौकिक वाटलें; आणि तिनें जें किंचित् मधुस्मित केलें तें पाहून आपल्या मनासारखी बायको मिळाली म्हणून त्यानें समाधानाचा एक मोठा उसासा सोडला. पण त्याच्या एकाच दृष्टिक्षेपानें तिची मात्र केविलवाणी स्थिति झाली.

श्रीरंगानें प्रेमभरानें तिच्याकडे पाहातांच त्याच्या नजरेंत कांहींतरी जहर असल्याचा तिला अनुभव आला. ती अगदीं घायाळ, दीन आणि घाबरी होऊन गेली. त्याची दृष्टी तिला सहन झाली नाहीं. इतकें मात्र खरें कीं, तिच्या रसरसित लावण्यानें श्रीरंग दिपून गेला. या पहिल्या दृष्टिभेटींतच त्याचें मन तिच्याकडे प्रबलतेनें ओढ घेऊं लागलें.

मोठया आवडीनें तिचें सासरचें नांव ‘ राधा ’ असें ठेवण्यांत आलें. सर्वांकडून तिचें कौतुक होऊं लागलें. सासूबाईला सूनबाईशिवाय मुळींच चैन पडेना. ती नेहमीं आपल्या आजूबाजूला असावी असें तिला वाटून सासू तिला सारा दिवस आपल्याजवळ गुंतवित असे.

श्रीरंगाला राधेशीं प्रत्यक्ष ‘ एक शब्द ’ बोलण्याचा जरी कधीं योग आला नव्हता, तरी नजरभेटीचे प्रसंग वारंवार येत, आणि त्यावरच त्याला आपली अधीरता संतुष्ट ठेवावी लागे. श्रीरंगाला आरंभीं घाबरलेली राधा आतां दिवसेंदिवस अधिक धीट होत चालली होती. आणि संवयीनें पूर्वीइतकें तिला आतां घाबरल्यासारखें वाटेनासें झालें. पण असेही प्रसंग कधीं कधीं येत आणि त्यावेळीं श्रीरंगाची उत्कट प्रेमानें भरलेली दृष्टि पाहून तिला भीतीनें धडकी भरे. आपण भ्यायलों आहों

असें जरी तिला प्रत्यक्ष वाटत नसे तरी भीती वाटायला कांहींच कारण नाहीं असें मात्र ती मनाला समजावी.

ज्या दिवसाची श्रीरंगानें आजवर वाट पाहिली तो दिवस अखेर येऊन ठेपला. सूर्य नेहमींपेक्षां सौम्य आहे, वारा सुवास पसरीत आहे, पक्षी आनंदानें गात आहेत आणि डोंगर जास्तच हिरवागार दिसत आहे, श्रीरंगाच्या मनाला त्या दिवशीं वाटलें.

त्या रात्रीं श्रीरंग आणि राधा यांच्या मीलनाची मंगल वेळा येणार होती. म्हणूनच हिरव्या चाफ्यांच्या विविध सुवासाप्रमाणें त्यांच्या मनांत कितीतरी गोड विचार येत होते; आणि हिरव्या चाफ्याचा सुवास जसा क्षणभर गोंधळवून सोडतो त्याप्रमाणें हे विचारही श्रीरंगाला गोंधळून सोडीत होते. सारा दिवस तऱ्हेतऱ्हेचे विधी चालले होते आणि मुकाट्यानें तो ठराविक तें सारें करीत सुटला होता. राधा त्याच्या बाजूलाच बसली होती. त्याच्या हाताचा स्पर्श होतांच ती विजेचा चटका बसावा तसें करीत होती. पहिल्यानें ज्यावेळीं एकमेकांचे हात एकत्र आले तेव्हां स्पर्शाबरोबर दोघांच्याही अंगावर रोमांच उभे राहिले. एकाचे आनंदाचे, तर दुसऱ्याचे भीतीमुळें उत्पन्न झालेले. ब्राह्मणाच्या पुढें असलेला तांब्या घेऊन त्यांतील पाणी फुलपात्रांत ओततांना तिच्या हातचा तांब्या खालीं पडून पालथा झाला. सर्वांनीं तिच्या भित्रेपणाची थट्टा केली. श्रीरंगाला कौतुक वाटलें; पण तिला मात्र लाजेनें मेल्यापेक्षांही मेलें होऊन गेलें.

यावेळीं लाजेनें तिच्या तोंडावर पसरलेली मनोरम लाली पाहून श्रीरंगाला ताज्या सफरचंदाची आठवण झाली. त्यानें कितीतरी वेळां मधून मधून चोरून तिच्याकडे पाहिलें असेल.

रात्रींच्या प्रशांत वेळीं एका शृंगारलेल्या खोलीच्या खिडकींत उभा राहून श्रीरंग बाहेरील शोभा पहात होता. बाहेर दंधासारखें स्वच्छ

चांदणें पडलें होतें. आपल्या तेजानें परस्परांना लाजविणाऱ्या नवलाख चांदण्या चमकत होत्या. त्या सर्वांहूनही तेजस्वी असा चंद्र प्रकाशत होता. आणि आसमंतात् भागांतील प्रदेश आकाशांतील अलौकिक तेजामध्यें बुडून जात आहे असें वाटत होतें. श्रीरंग गुंग होऊन गेला. एका गूढ भावनेनें त्याचें मन भरून आलें.

अंगणांत उभा असलेल्या विशाल आंब्याची फांदी खिडकीजवळ आलेली होती. तिचीं पानें मंद वायूच्या झुळुकेनें हालत होतीं आणि फुलझाडांच्या बागेकडून मधून मधून सुगंधलहरी येत होत्या.

राधा दारांत पाऊल टाकते तों श्रीरंग आपल्या विचारांत गढलेला तिला दिसला. तिनें आवरून धरलेला श्वास सोडला आणि तिथेंच दारांत ती उभी राहिली. अशा स्थितींत चार पांच मिनिटें निघून गेलीं. हातांतील साहित्यानें हात दमून गेल्यामुळें तिनें थोडी हालचाल केली.

कंकणरव ऐकून श्रीरंगानें बाजूला वळून पाहिलें, तों राधा उभी असलेली त्याला दिसली. " कोण, राधा ! " तो उद्गारला.

ती जागच्या जागीं संकोचली.

चौरंगावर तेवत असलेल्या समईकडे ती पाहात होती. समईच्या ज्योतीसारखी ती किंचित् थरथरत आहे असें श्रीरंगाला वाटलें. त्याला तिच्या भीरुतेची दया आली. आणि तो पुढें होऊन त्यानें तिला जवळ ओढलें. कांपऱ्या हातानें तिनें आपल्या हातांतील फुलमाळा त्याच्या गळ्यांत घातली आणि वांकून श्रीरंगाला नमस्कार केला.

  

मध्यरात्रींच्या सुमारास तो जागा झाला. त्या वेळीं चंद्राचे सफेत किरण खिडकीवाटे खोलींत आले होते. बाहेर दूर कुठेंतरी झाडावर बसून घुबड आवाज करीत होतें आणि त्याच्यावर तुटून पडून कुत्रा भुंकत होता.

श्रीरंग एका कुशीवरून दुसऱ्या कुशीवर वळला. शेजारीं झोंपलेल्या राधेकडे त्यानें पाहिलें; पण राधा त्याला जागेवर दिसली नाहीं. तो मनांत चरकला; आणि ताडकन् अंथरुणावर उठून बसला.

त्यानें चोंहीकडे बारकाईनें पाहिलें; पण राधा कुठेंच दिसली नाहीं. गोंधळून त्यानें बाहेर पाहिलें आणि झाडाच्या फांदीवर त्याला जें दिसलें त्यानें तो भीतीनें घाबरूनच गेला.

खिडकीजवळ आंब्याची जी फांदी आली होती तीवर एक पिवळी तेजाळ नागीण हळू हळू फिरत असलेली त्यानें पाहिली.

त्याच्या अंगाला दरदरून घाम सुटला. तोंडांतून शब्द फुटेना.

त्यानें डोक्यावरून पांघरूण घेतलें. त्याला श्वासोच्छ्वाससुद्धां करतां येईना. भीतीनें त्याच्या हृदयाची होत असलेली धडधड त्याला स्पष्ट ऐकूं येत होती. अशा स्थितींत तो किती वेळ तरी पडला होता.

सकाळीं तो झोंपेतून जागा झाला. रात्रीं पाहिलेल्या भयंकर प्रकाराची त्याला आठवण होऊन त्यानें वळून पाहिलें. राधा जवळ झोंपली होती. त्यानें लक्षपूर्वक तिच्या तोंडाकडे पाहिलें. पण अर्धवट उमललेल्या पुष्पावर विलसणाऱ्या शोभेखेरीज तिच्या तोंडावर दुसरें कांहींच दिसून येत नव्हतें. तो विचार करूं लागला, मग रात्रीं आपण जो प्रकार पाहिला तो खरा कीं खोटा? आणि पहिलेला तो प्रकार तरी किती भयंकर! पिवळी जर्द नागीण! हा विचार सुचतांच त्याच्या अंगावर शहारे आले. तसेंच राधाही आपल्या शेजारीं नव्हती. हें काय गौडबंगाल आहे! मग तें सारें स्वप्न तर नसेल? हो स्वप्नच. नाहींतर असे अद्भूत प्रकार सत्यसृष्टींत कोठले दिसायला! खास तें आपल्याला स्वप्नच पडलें असावें.

ही स्वप्नाची कल्पना येतांच त्याला पुष्कळ बरें वाटलें. आणि अशा विलक्षण स्वप्नाचें त्याला मोठें हसूं येऊं लागलें.

केव्हां एकदां स्वप्नाची हकिकत आपण राधेला सांगतों असें त्याला झालें. त्यानें तिच्याकडे प्रेमभरानें पाहिलें; तिच्या गालांवर पसरलेल्या केसांना त्यानें आपल्या हातानें दूर केलें. आवेगानें त्यानें तिचें चुंबन घेतलें. राधा हळू हळू जागी झाली.

" राधा, ऊठ ना ! "

ती लाजेनें चूर झाली आणि हळूहळू उठून बसली.

पाहिलेलें स्वप्न तिला सांगावें असें त्याला वाटत होतें; पण न जाणों तें भयंकर स्वप्न ऐकून तिच्या कोमल मनाला धक्का बसावयाचा, या विचारानें तो बेत त्यानें तसाच ठेविला.

  

यानंतर दोन तीन महिन्यांचा कालावधी लोटला. राधा आतां श्रीरंगाबरोबर पूर्वीपेक्षां बऱ्याच मोकळेपणानें वागत होती. तिच्या एका एका गुणाची प्रचीति येऊन श्रीरंगही तिच्यावर अधिकाधिक प्रेम करूं लागला.

चांदणें संपून काळोखाला नुकतीच सुरवात झाली होती. अनंत तारकांचें मिणीमिणी चमकणारें तेज विस्तीर्ण वसुंधरेला कसें प्रकाशित करूं शकणार ? तरीही त्यांच्या अंधुक प्रकाशांत दिसणारें सृष्टीचें गूढ स्वरूप फारच मोहक दिसत होतें. आपल्या नेहमींच्या संवयीस अनुसरून खोलींत ताजी हवा खेळावी म्हणून श्रीरंगानें खिडकीचें दार उघडें ठेविलें होतें. आंब्याची फांदी सळसळत होती, श्रीरंग कसल्यातरी विचारांत गढून गेला होता. त्यामुळें बरीच रात्र झाली तरी त्याला झोंप येण्याचें चिन्ह दिसेना. डोकीवरून पांघरूण घेऊन झोंपेची आराधना करण्यास त्यानें आरंभ केला, पण त्या उपायानेंही त्याला झोंप येईना. अंथरुणावरून उठून खोलींत येरझारा घालण्यासही त्यानें सुरवात केली. बराच वेळ त्यानें असा क्रम चालविला. अखेर आतां झोंपावें असा विचार करून तो पुनः अंथरुणावर जाऊन पडला. आतां आपण खास झोंपणार अशीही त्यानें कल्पना केली; पण व्यर्थ. त्या उपायानेंही त्यास झोंप येईना. झोंप ही स्त्री जातीची असते. स्त्रीची जसजशी आराधना करावी तसतशी ती जास्त फुरंगटून बसते, आणि तिच्याशीं तुसडेपणानें वागतांच ती उलट आपलीच आराधना करावयास लागते

अशी एक कल्पना श्रीरंगाच्या डोक्यांत येतांच त्यानें आपलें विचारचक्र सैल सोडलें. जों जों तो विचाराच्या पाठीस लागला तों तों ते विचारही त्याला सुचेनासे होऊं लागले.

आणि या अवधींत त्याला गाढ झोंप लागून तो घोरूंही लागला. राधा केव्हांच झोंपली होती.

लवकर झोंपल्यामुळें राधेला पहांटेच्या दरम्यान जाग आली. तिची झोंप पुरी झाली होती. त्यामुळें उठून बसावें किंवा खिडकींतून बाहेरील शोभा पहावी अशी इच्छा साहाजिक होऊन तिनें डोळे उघडून बाहेर पाहिलें. खिडकीबाहेर कांहीं चांदण्या लखलखत असलेल्या तिला दिसल्या. ती पडल्या पडल्याच तिकडे पहात होती. इतक्यांत आकाशांतील एक चांदणी लखकन् तुटून पडतांना तिला दिसली या अपशकुनानें तिच्या स्त्री-हृदयावर मोठीच जखम केली. कांहींतरी भावी अशुभ गोष्टींच तर हें चिन्ह नाहीं ना, अशी कुशंका मनांत उद्भवून ती फार व्याकुळ झाली. आणि थोडी भीति वाटून श्रीरंगाला बिलगण्यासाठीं ती जरा सरकली. पण श्रीरग तिथें नसल्याचें तिला आढळून आलें.

तिला दुसरा चरका बसला. भयचकित मुद्रेनें तिनें सर्व बाजूंना पाहिलें, तों खिडकीवाटे मुंगुसासारखा एक प्राणी बाहेरून आंत शिरत असलेला तिला दिसला.

भयानें तिला आणखी एक चरका बसला.

तिनें कानठळ्या बसतील अशी एक किंकाळी फोडली आणि ती धाडकन् पलंगावरून खालीं जमिनीवर पडली.

सारीं माणसें झोंपेंत गुंग होतीं. अशावेळीं भीति व्याकुळ होऊन राधेनें फोडलेली किंकाळी सर्वांच्या कानीं पडून तीं झोंपेंतून धडपडून जागीं झालीं. घरांत एकच गोंधळ माजला. इतकेंच नव्हे तर ती किंकाळी बाहेरील निवांत वातावरणांत पसरून कुत्रींही भुंकूं लागलीं.

श्रीरंगाच्या खोलींत अल्पावधींत सारीजणें जमा झालीं. बेशुद्ध पडलेल्या राधेला उठवून बिछान्यावर निजविण्यांत आलें. कांदा फोडून

तिच्या नाकाजवळ धरण्यांत आला. कोणी तिच्या डोकीवर पाणीही शिंपडलें.

झोंपेतून जागें होऊन सोडावा तसा श्वास तिनें सोडतांच ती आतां शुद्धीवर येईल असें सर्वांना वाटलें.

श्रीरंगानें रडव्या स्वरानें व्याकुळतेनें विचारलें, " राधा, राधा, जागी हो ना ! " त्यानें तिला हळू हळू हालविलें.

डोळे उघडून तिनें पाहिलें तेव्हां पहिल्यानें श्रीरंग तिच्या दृष्टीस पडला.

" राधा, राधा ! " तो पुटपुटला.

बाजूला वळून पाहिल्यावर इतर मंडळीही तिच्या दृष्टीस पडली. सर्वांचीं तोंडें घाबरलेलीं दिसत होतीं. तिच्या सासूनें तिला हळू हळू सांवरलें आणि उठून बसविलें.

" राधा, काय झालं, घाबरलीस कां ? " तिच्या सासूनें विचारलें.

" स्वप्न का पडलं ? "

राधा त्याच गोष्टीचा विचार करीत होती. ज्या गोष्टीला आपण एवढें घाबरलें. ती गोष्ट खरी होती, का तें स्वप्नांतील दृश्य होतें, याचा ती आपल्या मनाशीं मेळ घालूं लागली. आणि ती खरी असल्यास त्याच्या शक्याशक्यतेचा ती विचार करूं लागली.

ती विचारांत गुंतून स्तब्ध राहिलेली पाहून, स्वप्नांत पाहिलेल्या दृश्याचें चित्र रेखाटण्याचा ती प्रयत्न करीत आहे असेंच सर्वांना वाटलें.

राधेला खरोखरीच कांहींच निश्चित उत्तर देतां येईना. ती त्या प्रकारानें घाबरून गेली होती, इतकें मात्र खरें. कांहींतरी अशुभ घडून येणार आहे, असें तिचें मन तिला सांगूं लागलें. कदाचित् पाहि-लेली गोष्ट स्वप्नही असेल; पण स्वप्नें तरी काय, तीं भावी गोष्टींचीं सूचकच नव्हेत का ? या अशुभ विचारानें तिच्या मनाला पुनः एक जोराचा धक्का बसला.

" राधा, काय झालं तुला, अशी काय करतेस ? " असा सासूनें पुनः कळवळ्यानें प्रश्न करतांच, तिला कांहींतरी उत्तर देणें भाग पडलें.

" कांहीं नाहीं. स्वप्नांत फार घाबरलें मी. " ती म्हणाली.

" काय पाहिलंस तूं स्वप्नांत ? "

" आतां आठवत नाहीं. "

घटकाभर विश्रांति मिळाली म्हणजे तिला बरें वाटेल, असें वाटून सर्वजण निघून गेले.

श्रीरंगानें पाहिलें, अजूनही राधा चिंताग्रस्त दृष्टीनें पाहात आहे. तो तिच्या अगदीं जवळ गेला. तिला त्यानें आपल्याजवळ घेतलें आणि विचारलें, " राधा, काय झालं ? "

पतीच्या प्रश्नाला उत्तर म्हणून तिनें आपले तेजस्वी डोळे त्याच्या नजरेशीं भिडविले. अंगावर शहारे आल्यासारखें तिला झालें.

" राधे, असं काय ? काय झालं तुला ? "

राधेनें आंवडा घेऊन म्हटलें, " सांगतें तर—"

" सांग पाहूं लवकर. माझा जीव बघ किती घाबरून गेला आहे तो ! "

राधेनें रात्रीं घडलेली आणि पाहिलेली सर्व हकीकत त्याला सांगितली. श्रीरंगाला काय वाटलें तें पाहाण्यासाठीं ती त्याच्या तोंडावरील हालचाली निरखून पाहूं लागली.

त्याचे डोळे आश्चर्यानें मोठे झाले होते.

श्रीरंग आपल्या मनाशीं स्वतः पाहिलेल्या स्वप्नाची आठवण करूं लागला. अशीं विलक्षण स्वप्नें आपणांस कां पडावींत याचा त्याला मुळींच उलगडा होईना. आणि स्वप्नें तरी कशीं चमत्कारिक ! एकाला सापाचें तर दुसऱ्याला मुंगुसाचें. यांत कांहींतरी गूढ असावें, असें त्याला वाटूं लागलें. एखाद्या भावी आपत्तीचें तें सूचक असावें असाही तर्क त्यानें मनाशीं बांधला.

" राधा, मी सुद्धां असेंच एक स्वप्न पाहिलें ! "

" हो ? "

'—नि स्वप्नांत मी केतकीच्या पानासारखी एक पिवळी नागीण पाहिली. ”

भीतीनें तिच्या अंगावर रोमांच उभे राहिले.

“ तेव्हां, राधा, या प्रकाराचा तलास लावला पाहिजे. कांहींतरी अनिष्ट घडून येणार असं मला वाटतं—”

“—अन् मला पण तसंच वाटतं. ” राधा बोलली.

“ नांदोसगांवच्या जगन्नाथ भटजींना बोलावून विचारूं—”

“ कोण, ते ज्योतिषी आहेत काय ? ”

“ हो. माळवणपासून सावंतवाडीपर्यंतच्या साऱ्या गांवांत त्यांचं नांव गाजतं आहे. त्यांनीं केलेलीं भविष्यं तंतोतंत खरीं ठरतात. त्यांना आजच निरोप देतों. बाबांची आणि त्यांची फार दोस्ती आहे. निरोप कळतांच काठी टेकीत टेकीत येतील ते. नाहीं तर डोळी पाठवूं. ”

“ मग आतांच द्या निरोप. ”

“ पण राधा, तूं उगाच घाबरूं नकोस हं ! हीं बोलून चालून स्वप्नं. त्यावर इतका विश्वास ठेवूं नये. ”

“ नाहीं; मी कशाला घाबरतें ! ” कांहींतरी बोलावयाचें म्हणून राधा बोलली आणि बळेंच हांसली. अंतर्यामीं मात्र भीतीनें तिचें हृदय अजूनही हालत होतें.

आतां पुरें उजाडलें होतें. दिशा फांकून गार वारा अंगाला झोंबत होता. आणि पूर्वेकडील सह्याद्रीच्या विशाळ डोक्यावर सूर्याचीं पिवळीं तांबूस किरणें पडूं लागलीं होतीं.

दुसऱ्या दिवशींचीच गोष्ट. श्रीरंगानें आपल्या बापाला, आपल्याला पडलेलें आणि राधेला पडलेलें अशीं दोन्हीं स्वप्नें सांगून त्या स्वप्नांच्या खरेखोटेपणाची आणि पुढें होणाऱ्या अशुभाची बरीच चर्चा केली. त्याच्या बापालाही मोठी काळजी उत्पन्न झाली. त्यानें जगन्नाथ भटजींना आणण्यासाठीं तावडतोब डोळी पाठवून दिली.

श्रीरंगाला आतां जरा बरें वाटलें. संध्याकाळीं जगन्नाथ भटजी येतील आणि स्वप्नांचा उलगडा करतील या विचारानें त्याची भीती बरीच कमी झाली. त्यांनें राधेलाही भिण्याचें कांहीं कारण नाहीं म्हणून सांगितलं.

संध्याकाळपर्यंत त्यांनीं भटजींची वाट पाहिली. पण ते कांहीं आले नाहींत. त्यानें सर्वांचीं मनें अस्वस्थ झालीं. अगदीं तिन्हीसांजा गडी परत आला. त्याच्या सांगण्यावरून जगन्नाथ भटजी शेजारच्या गांवीं गेल्याचें कळलें. त्रे दुसरे दिवशीं सकाळीं परत यावयाचे होते. या वार्तेनें सर्वांचा विरस झाला पण उद्यां सकाळीं तरी भटजी येतील असा समाधानाचा विचार करून सर्वजण झोंपी गेले.

रात्रीं निजतेवेळी श्रीरंगाच्या आणि राधेच्या मनांत आदले दिवशींच्या स्मृतीनें भीतीचे तरंग उठत होते. त्यानें खिडकीचीं दारें अगदीं गच्च लावून घेतलीं आणि समाधानानें तो झोंपी गेला. राधा त्याला अगदीं बिलगून झोंपली होती. बराच वेळपर्यंत त्यांना झोंप लागली नाहीं. शेवटीं या कुशीवरून त्या कुशीवर असें करीत गुंगीनें त्यांना झोंप लागली.

❦ ❦ ❦

त्याना अगदीं गाढ झोंप लागली होती. खोलींत काजळासारखा काळोख पडला होता, बाहेरही तसाच काळोख होता.

आणि अशा वेळीं, राधा जें श्वसन करीत होती त्यांतून एक तेजस्वी बारीक आकृति जसजशी हळू हळू बाहेर येऊं लागली, तसतसा राधेचा देहही नाहींसा होत चालला आणि त्या ठिकाणीं श्रीरंगानें स्वप्नांत किंवा सत्यसृष्टींत पाहिलेली पिवळी नागीण दिसूं लागली.

ती नागीण चपलतेनें पलंगाच्या खुरावरून खालीं उतरली. इकडे तिकडे काळोखांत फिरून ती बाहेर जाण्यासाठीं वाट पाहूं लागली. पण खिडकीचीं दारें बंद असल्यानें तिला बाहेर जातां येईना. ती मागें परतली. आणि बाहेर जाण्याचा मार्ग शोधूं लागली. काळोखांत तिच्या पाठीवरील दहाचा आंकडा तेजानें चमकत होता. बाहेर जाण्यास कुठेंही मार्ग राहिला नाहीं असें पाहून ती शेवटीं टेबलावर चढली. पुस्तकांचीं

तिनें हितगुजें केली. कितीतरी वेळ ती इथें फिर, तिथें फिर असें करीत होती. श्रीरंगाकडे तिनें टवकारून पाहिलें. फणा करून तिनें त्याच्याकडे आपले तेजस्वी डोळे लाविले.

माणूस आणि साप. पिढीजाद वैर. माणूस दृष्टीस पडतांच सापाची हिंसेची भावना जागृत व्हावी यांत फारसें नवल नाहीं. श्रीरंगाकडे नजर जातांच तिची दुष्ट भावना जागी झाली. तशांत तो झोंपी गेलेला. दंश करण्यास तिची फाटकी जिव्हा फुरफूरूं लागली. ती आपल्या भक्ष्याला पाहून फणा फुलवून डोलूं लागली. त्याच्यावर ती पावित्र्यांत उभी राहिली.

इतकें करूनही उडी टाकण्याचें धैर्य तिला होईना. उडी टाकण्यासाठीं आणलेलें अवसान विरून जाऊं लागलें. एकादी गूढ शक्ति जणूं तिला मागें खेंचीत आहे, असें ती करीत होती.

इतक्यांत काय चमत्कार झाला ! ती नागीण भीतीनें जागच्या जागीं थिजून गेली.

श्रीरंग निजला होता त्या ठायीं श्रीरंगाऐवजीं एका मुंगुसाची आकृति दिसूं लागली.

नागिणीला भिवविणारें मुंगूसच होतें. मुंगूस आणि साप यांचें सख्य प्रसिद्धच आहे.

दोघांची नजरानजर झाली. नागिणीनें आपली फणा खालीं वांकविली. जणूं ती शरणच आली. मुंगुसाच्या डोळ्यांत तप्त निखाऱ्याचें तेज झळाळत होतें. मूर्तिमंत क्रोध त्याच्या डोळ्यांत अवतीर्ण झाला आहे कीं काय असें त्या दीन नागिणीला वाटलें.

तें मुंगूस एक एक पाऊल पुढें पुढें येऊं लागलें, तसतशी ती नागीण टेबलाच्या खालीं उतरूं लागली. ती कोपऱ्यांत वेटाळें करून थरथर कांपत राहिली. मुंगूस जवळ जवळ आलें. त्यानें आपल्या तीक्ष्ण नजरेनें तिच्याकडे एकवार पाहिलें.

आणि आपला पाय पुढें घातला. प्रत्यक्ष मृत्यु पुढें हजर असतां कोण कसा प्रतिकार करणार ! त्या नागिणीनें मुळींच हालचाल केली नाहीं. थरकांप होण्याइतकें सामर्थ्य सुद्धां तिच्यांत उरलें नव्हतें.

मुंगुसानें आपला पंजा तिच्यावर ठेवला. मुंगुसाचा पंजा म्हणजे मृत्यूचा जबडा, असेंच सापाला वाटतें. त्या पंजाचीं अणकुचीदार वक्र नखें म्हणजे मृत्यूच्या मूर्तिमंत दाढाच !

त्यानें नागिणीला आपल्या पंजांत पकडलें. भीतीनें, व्याकुळतेनें आणि नाइलाजानें तिनें एक कर्कश किंकाळी फोडली. पण कितीही झालें तरी ती एका नागिणीची किंकाळी होती. कितीही कर्कश झाली म्हणून तिची गर्जना थोडीच उठणार ? तिची ती नाजूक किंकाळी त्या गाढ अंधारांत कुठल्या कुठें गडप होऊन गेली. जनात अशा कितीतरी किंकाळ्या वाऱ्यावर विरून जातात; त्या लोकांच्या कानावर जातच नाहींत.

मुंगुसानें नागिणीच्या अंगाचा रवका घेतांच तिनें सुटून जाण्यासाठीं थोडी धडपड मात्र केली; पण व्यर्थ! जिकडे तिकडे रक्त सांडलें. नागीण मरून पडली.

रक्तानें माखलेलें तोंड चाटीत चाटीत मुंगूस बिछान्यावर चढलें. अंथरुणावरही रक्ताचे शिंतोडे पडले.

थोड्या वेळानें श्रीरंगाचें घोरणें खोलींत घुमूं लागलें.

सकाळीं श्रीरंग नेहमींपेक्षां उशीरां जागा झाला. अंगाला आळेपिळे देत त्यानें राधेला चांचपून पाहिलें. पण ती तिथें कुठें होती ? तो चमकला. त्याला स्वतःच्या स्वप्नाची आठवण झाली. तो दचकला; धडपडून उठला. पण ती त्याच्या दृष्टीस पडली नाहीं.

तो तडक उठला आणि खिडकी उघडून त्यानें सूर्यकिरणांना आंत प्रवेश करूं दिला.

त्या सूर्य प्रकाशानें त्याला काय सांगितलें ? बिछान्यावर त्याला

रक्ताचे डाग दिसले; आणि राधेऐवजीं तिचें लुगडें आणि अलंकार मात्र पडलेले होते. त्यानें भयानें आजूबाजूला पाहिलें. जमिनीवर दृष्टि जातांच रक्ताचा सडा त्यानें पाहिला. तो सडा टेबलापर्यंत पोंचला होता. आणि कोपऱ्यांत स्वप्नांत पाहिलेली नागीण मरून पडली होती.

तो खोलीबाहेर पडला. घरांत त्यानें राधेची शोधाशोध केली. पण राधा कुठें होती ?

" राधा, राधा, तूं कुठें आहेस ? " रडकुंडीला येऊन श्रीरंग उद्‌गारला.

घरांतली आणि शेजारची मंडळी श्रीरंगाच्या खोलींत जमा झाली. आश्चर्यानें सारे जण त्या मेलेल्या नागिणीकडे पाहात होते. ही भुताटकी कशी झाली याचें ते आश्चर्यच करीत होते.

बाहेर जगन्नाथ भटजी आल्याची कुणीतरी वर्दी दिली. काठी टेंकीत टेंकीत वार्धक्यानें थकलेले भटजी घरात येऊन दाखल झाले. त्यांनीं स्वच्छ पंचा पेहरला असून कंबरेला उपरणें बांधलें होतें. त्यांच्या काळसर अंगकांतीवर शुभ्र यज्ञोपवीत उठावदार दिसत होतें. त्यांच्या डोकीवर एकही केंस शिल्लक राहिला नव्हता. जुनाट दोरीनें बांधलेल्या चष्म्यांतून पाहात त्यांनीं विचारलें, " काय रे, काय झालें ? मस कशाला बोलावलेंस ? "

श्रीरंगाच्या वडिलांनीं सारी हकीकत त्यांना सांगितली. ती ऐकून घेऊन गंभीर मुद्रा करून जगन्नाथ भटजींनीं पंचांग उघडून पाहिलें.

" चला, खोलींत जाऊं श्रीरंगाच्या. " ते म्हणाले.

खोलींत गेल्यावर साऱ्या गोष्टींचें त्यांनीं निरीक्षण केलें आणि श्रीरंगाकडे वळून ते उद्‌गारले, "चांडाळा, आपल्या बायकोचा घात केलास— पूर्व जन्मींचे वैरी ! "

जगन्नाथ भटजींच्या या उद्गारांनीं सर्वजण आश्चर्यचकित झाले.

" तिचें जातक नागिणीचें, तुझें मुंगुसाचें. भक्षकानें आपलें भक्ष्य घेतलें—" श्रीरंगाला उद्देशून पण स्वतःशींच ते पुटपुटले. त्यांनीं

मान वर करून डोळे मिटले, "ईश्वरा, तुझी लीला अगाध आहे! आम्हीं केवळ पामर—"

श्रीरंगाच्या मनावर भटजींच्या शब्दांचा मोठा परिणाम झाला. स्थिरावलेल्या नजरेनें तो त्या मेलेल्या नागिणीकडे पाहात होता. दुःखापेक्षां आश्चर्यच त्याच्या तोंडावर दिसत होतें.

इतका वेळ आंवरून घेतलेले त्याचे अश्रू आईचा हुंदका कानीं पडतांच वळवाच्या पावसासारखे सरसर वाहूं लागले.

राधेची साडी हृदयाशीं धरून तो मोठ्यानें शोक करूं लागला, "राधा, तूं कुठें आहेस!"

# बळी



मुलगा आजारी असल्यामुळें जानकीची मनःस्थिति मोठी चमत्कारिक झाली होती. मागील प्रसंगांची पुनरावृत्ति यावेळींही होणार नाहीं ना, अशी कुशंका मनांत येऊन तिच्या मनाला विलक्षण हुरहूर लागून राहिली होती. तिची दोन्हीं मुलें जन्मल्यानंतर एक दोन महिन्यांनीं एकाएकीं तिला सोडून गेलीं होतीं. त्यामुळें आतां तिच्या मनांत हजारों शंका येऊन जात होत्या. जो उपाय कोणी सांगेल तो तो ती करून पाही. पण मुलाला गुण येत नव्हता. आतां हा मुलगा सुद्धां आपणांस सोडून जातो, कीं काय, असें तिला वाटून ती वेड्यासारखी होई.

तिच्या वयाला पस्तीस वर्षें झालीं तरी तिला मूल झालें नव्हतें. मुलांची तर तिला बाळपणापासून अतिशय आवड. त्यामुळें ती सदा कष्टी असावयाची. शेजाऱ्यापाजाऱ्यांच्या मुलांचें कौतुक करण्यांत आरंभीं तिला मोठें सुख होत असे. पण जसजशी मूल होण्याची तिला आशा दिसेना, तेव्हां तिच्या हृदयांतील वात्सल्य नाहींसें होऊन त्याची जागा तिरस्कारानें घेतली. कोणाचेंही सुंदर मूल पाहिलें कीं, तिला त्याचा मत्सर वाटे. त्याला जवळ घ्यावें असें तिला वाटे, पण स्वतःला मूल नाहीं ही भावना लगेच जागृत होऊन ती त्याकडे पूर्णपणें दुर्लक्ष करी.

ही वृत्ति पुढें तर अगदींच प्रबळ झाली. त्यानंतर झालेलीं दोन्हीं मुलें बाळपणीं अकालींच तिला सोडून गेलीं होतीं. सुप्तावस्थेंत असलेला तिच्या हृदयांतील वात्सल्याचा झरा पाझरूं लागावा, तोंच तो कोरडा पडला. त्यामुळें तिची वृत्ति अगदीं वेडीपिशी झाली होती. दुसऱ्याचें मूल पहातांच तिला आपल्या मृत बाळांची आठवण होऊन तिच्या हृदयाचा विलक्षण थरकांप होई.

चार महिन्यापूर्वी तिच्या घरांत एक नवें मूल जन्माला आलें होतें. त्यामुळें तिच्या जीवनांत थोडीतरी टवटवी आली. पण मागील प्रसंग आठवतांच तिचा धीर सुटे. दुर्दैवानें हा मुलगा जन्मतः अशक्त असल्यामुळें सदा आजारी असावयाचा. त्याला बरें वाटावें म्हणून सारे उपाय केले, डॉक्टर-वैद्यांचीं औषधें झालीं, पंचाक्षरी, मांत्रिक यांचे तंत्रमंत्रही चालू ठेविले. तिच्या या उपायांच्या माऱ्यानें त्याचा आजार निर्बल होण्याऐवजीं तो मुलगाच निर्बल होत होता, त्यामुळें काय करावें हें जानकीला सुचेना.

मांत्रिकानें तिला एक रामबाण उपाय सांगितला होता. पण तो कसा अंमलांत आणावा हें तिला कळत नव्हतें. औषधानें मुलगा बरा होईना म्हणून ती मांत्रिकाकडे गेली, तेव्हां पायाळू मांत्रिकानें अंजन लावून पाहिलें आणि तिला सांगितलें, " मुलाच्या अंगावर समंध बसला आहे. तो त्याला सुख लागूं देत नाहीं. औषधांनीं कांहीं होणार नाहीं. त्याला रक्ताची तहान लागली आहे. त्यानें पूर्वी दोन बळी घेतले. आतां तिसराही घेतल्याशिवाय तो राहाणार नाहीं. कोणाचेंतरी लहान मूल समंधाला बळी दिल्याशिवाय तो शांत होणार नाहीं. बाई, तुला तुझा मुलगा हवा असेल तर आधीं या समंधाची शांति कर ! "

मांत्रिकाच्या या उद्गारांनीं जानकीच्या हृदयानें ठावच सोडला. कोणाचा तरी बळी दिल्याशिवाय आपलें मूल वांचत नाहीं, अशी तिची बालंबाल खात्री झाली. कांहीं झालें तरी त्याला वांचवावयाचें असा तिनें आपल्या मनाशीं निश्चय केला. हा निश्चय झाल्या-

पासून कोणाचेंही लहान मूल दृष्टीस पडलें, कीं तिच्या मुद्रेंत खून चढलेला दिसून येई.

ती मुलाच्या शोधांत होती. परन्तु अजून कोणी सांपडलें नव्हतें.

आजही ती अशाच प्रकारचे विचार करीत आपल्या झोंपडीच्या दारावर जमिनीवर बसली होती.

रामा गावताची झोंपडी म्हणजे गोगलगाईचें घर. भूकंपानें घर अंगावर पडून त्याखालीं रामा खास मेला नसता. चारी बाजूंना माडांच्या झापांचा कूड आणि केंबळ्याचें दाट आच्छादन. अशा घरांत त्याच्या कित्येक पिढ्या गेल्या होत्या. झोंपडींतील संसारही काहीं मोठासा नव्हता. चारसहा मातीचीं मडकीं आणि दोन तांब्याचीं भांडीं.

अशा सुदामाच्या संसारांतही रामा संतुष्ट होता.

दारावरून जानकीनें पाहिलें. नारळीच्या बागांतून रामा एक लहान मूल घेऊन आपल्या घराकडे येत होता. त्याच्याजवळ असलेलें मूल त्याला काहींतरी विचारीत होतें. त्यामुळें रामाला वाटेंत थांबून त्याच्या प्रश्नांचीं उत्तरें द्यावीं लागत होतीं.

हळू हळू रामा घराजवळ आला. त्याच्या अंगांत सोलापुरी कापडाचें मुंडासें आणि ढुंगणाला एक फडकें गुंडाळलेलें होतें. त्याच्याजवळ असलेला मुलगा जितका जास्त गोरापान होता तितकाच जास्त रामा खडकासारखा काळा होता. त्याला जानकीनें विस्मयानें विचारलें, "कोणाचा मुलगा? धनीसायबांचा का?"

"होय." रामा उत्तरला. "किती दिवस माझ्या बरोबर यायला बघत होता. पण लहानं म्हणून मी आणला नाहीं. आज हट्टच घेतला तेव्हां पाठवला धनीसायबांनीं!"

"किती गोड मुलगा आहे!" जानकी उद्गारली.

जानकी त्याला पाहून मोहित झाली. सोनचाफ्याच्या मुकत्याच उमलणाऱ्या कळीसारखी पीतधवलमिश्रित अशी त्याची अंगकांती, चांदण्या रात्रीं माडाच्या बागांतून चुडताआड दिसणाऱ्या

चंद्रासारखें त्याचें तोंड, वाऱ्यावर भुरुभुरु उडणारे काळे कुरळे केंस आणि चोहींकडे जिज्ञासेनें पहात फिरणारी त्याची चंचल नजर पाहून जानकीला त्याला जवळ घ्यावें असें वाटलें. तिनें त्याला घेण्यासाठीं आपले दोन्ही हात पुढें सुद्धा केले. पण एकाएकीं काय झालें कोणास ठाऊक. तिनें आपले हात मागें घेतले, आणि आपली दृष्टी दुसरीकडे वळविली.

“ किती छान लेकरूं आहे. तुला नाहीं का घ्यावासा वाटत ? ” रामानें विजयाला पुढें करीत जानकीला विचारलें.

“ हो, न वाटायला काय झालं ? ” स्वतःला सांवरून घेत जानकीनें उत्तर दिला, आणि विजयाला आपल्याकडे घेतलें.

थोडयाच वेळांत विजयाला जानकी आवडूं लागली. तिनें त्याला शहाळीं खायला दिलीं, तेव्हां तिला सोडून जाण्यासही तो तयार होईना.

त्या दिवसापासून विजय आपल्या ‘ जाक्कीला ’ भेटायला दररोज रामाबरोबर येऊं लागला.

  

विजयाला पाहून जानकीच्या विचारांचा ओघ एका विशिष्ट दिशेनें वाहूं लागला. भरतीच्या वेळीं एकादी वसाड किनाऱ्याला वारंवार स्पर्श करून जावी तसा तिच्या मनांत सध्यां येणारा विचार विजयाला पहातांच वारंवार येऊन जात असे. पाहिल्यानें विजय तिच्या घरीं आला तेव्हाच याला वळी द्यावा काय, असा विचार तिच्या मनाला चाटून गेला होता. हल्लीं तर विजय तिच्या घरीं येत होता, आणि त्यांत तिच्या मुलाचें दुखणें जास्तच विकोपाला जात होतें. त्यामुळें तिच्या विचाराला मूर्तस्वरूप येऊन विजयाला कसा पळवावा याचा ती विचार करूं लागली.

ती योग्य संधीची वाट पहात होती.

अशी संधी मिळणें जानकीला फारसें कठीण नव्हतें. रामा, गलबतवाल्या देसायांचा खलाशी असून तो सदा त्यांच्याच घरीं असावयाचा

त्याच्यावर मालकांचा लोभ असल्यामुळें जानकीही त्यांच्या घरीं कधीं कधीं जात असे.

अशीच एकदां जानकी त्यांच्या घरीं मालवणच्या मेढयांत जावयास निघाली. ती त्यांच्या घराबाहेरील गडग्याजवळ आली तेव्हां विजय एकटाच तेथें उभा असलेला तिनें पाहिला. त्याला पहातांच जानकीनें आजूबाजूला साशंक दृष्टीनें पाहिलें. कातर वेळ झाली होती. आजूबाजूला जाणारांची फारशी जाग नव्हती.

जानकी हलकेच पुढें झाली, इतक्यांत विजयानेंही तिला पाहिलें, आणि ' जाङ्की ' म्हणून ओरडत तो तिच्याकडे धांवला.

जानकीनें त्याला उचलून कंबरेवर घेतलें.

" जाङ्की, तुज्या घलीं तल. मला छालं दे ! " विजय तिला म्हणाला.

जानकीनें पडत्या फळाची आज्ञा मान्य करून सुसरीच्या गतीनें घरची वाट धरली. मालवणची वेळ संपून दांडीपुढें ती केव्हां आली हें तिचें तिला सुद्धां समजलें नाहीं.

त्यावेळीं नुक्ताच काळोख पडूं लागला होता. सिंधुदुर्गाचे प्रचंड तट अंधूक अंधूक दिसत होते. " मोऱ्याच्या धोंड्या " पर्यंत फिरायला गेलेली मंडळी केव्हांच परतली होती.

जानकी घरीं आली. तिनें विजयाला खालीं ठेविलें. आणि खाडू दोन्ही पायांत अडकवून दारासमोरील माडावर ती उंदराप्रमाणें सुरसुरु चढली. एक कवळें शहाळें काढून त्याचा देंठ दांतांत धरून ती तशीच झटकन् खालीं उतरली. तिनें आपल्या दांतांनींच तें शहाळें सोललें आणि आंतला नारळ दगडावर आपटून फोडला आणि नखांनीं खोबरें काढून विजयाला खायला दिलें. विजयाला शहाळें खायला मिळाल्याबरोबर मोठा आनंद वाटला. बोलतां बोलतां दिवसभर खेळून दमल्यामुळें तो तेथेंच झोंपी गेला.

जानकीनें त्याला हळूच बाजूला एका जुनेरावर निजविलें. आणि रामाची वाट पहात ती झोंपडीबाहेर येऊन उभी राहिली.

थोड्यावेळानें कोणीतरी लांबून धांवत येत असलेला तिनें पाहिला. तो रामाच होता. धांपा टाकीत जानकीपुढें येऊन तो म्हणाला, " जानकी, विजू इकडे आला आहे का ? नाहीं ? मग मोठा घातच झाला म्हणायचा ! "

" हो, पण काय झालं, सांगाल कीं नाहीं ? "

" संध्याकाळीं तर होता. कातरवेळेला कुठं नाहींसा झाला. सगळीकडे सोधासोध चालली आहे. इकडे नाहीं आला म्हणतेस ? मग मी जातों तर. धनीसायबांना लवकर सांगायला हवं. " असें म्हणून रामा धांवत गेला सुद्धां.

तो जातांच जानकी समाधानानें हंसली.

आतां विलंब लावून उपयोगाचें नाहीं म्हणून ती आपल्या घरांत शिरली. ज्याच्यासाठीं ती एवढें साहस करीत होती, त्या आपल्या बाळाला तिनें न्याहाळून पाहिलें. तो स्वस्थ झोंपी गेला होता.

काहींसें पुटपुटत ती विजयाजवळ गेली. अगदीं शांतपणें तो झोंपीं गेला होता. दिव्याच्या अंधूक प्रकाशांत त्याचा चेहरा जानकीला दिसला नाहीं.

तिनें त्याला उचललें आणि झोंपडीचें दार बंद करून लावसटीसारखी ती त्या दाट अंधारांतून ' मोऱ्याच्या धोंड्या ' जवळ विजयाला बळी देण्यासाठीं बाहेर पडली.

ती अमावास्येची रात्र होती. काजळासारखा दाट काळोख पसरला होता. जणुं आकाशांतून पृथ्वीवर काजळाचा पाऊसच पडत होता. नारळीच्या बागांत चुडतें वाऱ्यानें हलून सळ् सळ् असा जोराचा आवाज येत होता. मधूनच कोठेंतरी पडणाऱ्या बोंड्यांचा ध्वनि ऐकूं येत होता. समुद्राला भरती आली होती. आणि अवदानी लाटा किनाऱ्याला भिजवून टाकीत होत्या. वेळेवरून चालणाऱ्या जानकीच्या पायाला लाटांच्या

पाण्याचा स्पर्श कितीतरी वेळां झाला असेल. पण ती आपल्याच विचारांत गुंतून गेल्यामुळें तिला दाद नव्हती. तिला कशाचेंही भान नव्हतें. तिला त्यावेळीं कोणी पाहिलें असतें तर जणुं अमावास्येच्या रात्रीं अळवत संचार करीत आहे असाच भास झाला असता.

समुद्रावरून वाहणाऱ्या घों घों वाऱ्यानें विजयाला जाग आली. त्यानें आपले चिमुकले डोळे उघडून पाहिलें. पण त्या काळोखांत त्याला कांहीं दिसलें नाहीं. किंवा त्याला दाट काळोखच दिसला असें म्हटलें पाहिजे. त्या गडद काळोखाची त्या चिमण्या बालमनाला भीति वाटली. म्हणून तो जानकीच्या अंगाला हळूच बिलगला. त्या बाल-मिठीचें सौख्य अनुभविण्याच्या स्थितींत जानकी नव्हती. ती सारखी चालत होती.

'मोऱ्याच्या धोंड्या' जवळ येतांच ती थांबली. तिनें इकडे तिकडे न्यहाळून पाहिलें, आणि ती भरतीच्या पाण्यांतून समुद्राकडे चालूं लागली. गुढगाभर पाण्यावर येताच कांहींसें पुटपुटत तिनें विजयाला पाण्यांत टाकण्यासाठीं पुढें केला. इतक्यात एक जोराची लाट किनाऱ्यावर जाऊन आपटली. त्या आवाजानें आणि पाण्याचे तुषार अंगावर पडून शहारे आल्यामुळें विजय दचकला. जानकीच्या कुशींत डोकें खुपसून तो तिला अगदीं घट्ट बिलगला. त्यानें आपल्या बोबड्या बोलांत भीतीनें जानकीला हांक मारली.

"जाङ्की!"

त्या हांकेतील मार्दवानें आणि त्याच्या चिमुकल्या आलिंगनानें जान-कीच्या अंगावर सुखकारक रोमांच उभे राहिले. तिचें हृदय वात्सल्यानें भरून आलें. तिनें त्याचें कापसासारखें मऊ मऊ आंग नकळत आपल्या हृदयाशीं अधिकच दाबलें. आणि वात्सल्याच्या भरात त्याचे पटापट मुके घेतले. आवेगानें पुनः उराशीं धरून एका हातानें त्याला पाठीवर थोपटीत ती उद्गारली. "नाहीं बरं, माझ्या पाडसाला नाहीं मी मारणार. जळो माझे रांडेचे हात!"

जानकीला रडूं आलें. तिच्या डोळ्यांतील अश्रु समुद्राच्या पाण्यांत मिसळून गेले.

" जाङ्की ! " विजयानें हांक मारली.

" बाळा भिऊं नको हं ! "

घाबरलेल्या विजयाला तिच्या आश्वासनानें समाधान वाटलें. कोंडलेला श्वास सोडून त्यानें निःशंकपणानें तिच्या खांद्यावर मान टाकली आणि लगेच निर्भयपणें तो झोंपी गेला.

जानकी विजयाला घेऊन तडक घरीं परत निघाली. झोंपडीच्या दारावर उभा राहून रामा तिची वाट पहात होता.

त्याला पहाताच जानकी दचकली. आतां विजयाबद्दल काय सागावें याची तिला भीति वाटूं लागली. तिला पाहून रामानें विचारलें, " कुठं गेली होतीस ? "

ती गोंधळली.

इतक्यांत रामाची दृष्टी विजयाकडे जाऊन तो आनंदानें ओरडला, " काय सांपडला ? सोधायला गेली होतीस वाटतं ! माझ्या रत्ना ! " रामानें धांवत जाऊन विजयाला आपल्याकडे ओढून घेतला. आणि धावतच तो देसायांच्या घरीं जाण्यास निघाला.

जानकी वेड्यासारखी त्याच्याकडे पहातच राहिली.

क्षणभरानें ती भानावर आली. तिनें झोंपडीचें दार उघडलें आणि घरांत प्रवेश केला. आपल्या लाडक्या बाळाला भेटायला ती अधीर झाली होती. ती आंत गेली. मूल स्वस्थ झोंपलें होतें. तिनें त्याच्या तोंडावरील फडकें दूर करून कौतुकानें त्याच्याकडे पाहिलें. त्याला पाहून जानकीला दचकल्यासारखें झालें. तिनें त्याच्या अंगाला हात लावून पाहिलें. बर्फातील माशांसारखें थंडगार होतें तें.

जानकीनें दुःखानें कपाळावर हात मारून घेतला.

—१९३५



# सहज



रघुनाथ सकाळीं उठून घराबाहेर आला. डोळे चोळीत चोळीत त्यानें आपल्या केळींच्या बनाकडे नजर टाकली, त्याची नासधूस झालेली त्याला आढळून आली. त्याची डोळ्यांतील झोंपेची गुंगी पार उडली. त्याला चरका बसला. चिडून त्यानें केळींच्या बनाकडे धूम ठोकली.

नुकतेंच फोफावूं लागलेलें केळीचें रोपें मोडून गेलें होतें मोठया केळींचीं सोपें ओढून काढल्यामुळें त्यांची दुर्दशा झाली होती. हा प्रकार पाहून रघुनाथची छाती फाटून गेली. त्यानें मोठया श्रमानें मोठें सुंदर बन निर्माण केलें होतें. त्याला चीड आली. कोणाच्यातरी गुरानें परसांत शिरून हें काम केलें असलें पाहिजे म्हणून तो आसपास एकादें गुरूं दिसतें कीं काय तें पाहूं लागला. असें एकादें गुरूं आपल्याला दिसावें आणि त्याला आपण यथेच्छ बडवावें इतका त्याला त्वेष आला होता. तो केळीच्या बनापलीकडील बाजूकडे गेला.

तेथें एक गोजिरवाणी गाय रवंथ करीत खुशाल पडून राहिली होती.

रघुनाथानें पाहिलें. तिला पाहिल्याबरोबर त्याचा त्वेष कुठच्या कुठें पार नाहींसा होऊन त्याच्या डोळ्यांत स्नेह दिसूं लागला. त्यानें धांवत जाऊन तिला कुरवाळलें आणि हंसून तो म्हणाला, " कोण, कपिला ! तुझाच

पराक्रम वाटतं हा ! माझं केवढं नुकसान केलंस याची तुला कल्पना तरी आहे ? ”

कपिलेनें मान हालवून त्याचा पाय आपल्या खरखरीत जिभेनें चाटण्यास सुरवात केली. रघुनाथाच्या अंगावर सुखकारक शहारे उभे राहिले. त्याला आईची आठवण झाली. आपली आई अंगावरून हात फिरवीत असे त्यावेळीं असेंच सुख होत असे असें त्याला वाटलें. त्यानें स्नेहभावानें तिला पुनः कुरवाळलें. तिच्या मानेवर आपलें डोकें घासलें. आणि तिच्या पाठीवर थोपटलें. कितीतरी वेळ तो असा तिच्या जवळ बसून राहिला होता. कपिला त्याचें डोकें, त्याचें अंग आपल्या जिभेनें चाटीत होती आणि गुदगुल्या झाल्यामुळें रघुनाथाला मोठी गंमत वाटत होती.

“ कपिले, कुठं होतीस तूं इतके दिवस ? दादानं तुला कोंडून का ठेविली होती ? कशी आली नाहींस या बाजूला अगदीं, अं ? ” तो उद्गारला.

घरांत बायकांचें पटेना म्हणून रघुनाथ आणि त्याचा विश्रामदादा निराळे राहिले होते. कापिला गाईवर रघुनाथाचें अत्यंत प्रेम होतें. पण ती विश्रामाच्या वांटणीला गेल्यामुळें रघुनाथाच्या जिवाला चुटपूट लागून राहिली होती. त्यानें विश्रामाकडे गाय आपणास देण्याविषयीं मध्यस्थी केली. पण त्याच्या वहिनीनें मोडता घातला. त्यामुळें रघुनाथाला गाय मिळाली नाहीं.

तरी कपिला मधून मधून रघुनाथाला अशी भेटे. ती भेटली म्हणजे रघुनाथाला कोणीतरी जिव्हाळ्याचें माणूस भेटल्यासारखें वाटे. आतांही कपिला त्याला अशीच बऱ्याच दिवसांनीं दिसली होती.

त्यांचें हितगूज बराच वेळ चाललेलें होतें. सकाळचा शीतल वारा वाहात होता. पूर्वेकडे तांबडेंलाल झालें होतें. मोहरलेल्या आंब्याचा मधुर वास उत्तेजित करीत होता आणि जवळच्या रानांत कोकिळा-कवडे आवाज करीत होतीं.

या वातावरणाचा रघुनाथाच्या मनावर परिणाम झाला. त्यानें कपिलेच्या मानेवर डोकें टाकलें आणि तो स्वस्थ पडून राहिला.

खळ्यांत झाडीत असलेल्या सीतेनें हें दृश्य पाहिलें. तिला मोठें कौतुक वाटलें. पण लगेच कांहीं विचार मनांत येऊन ती लगबगीनें तेथें गेली आणि रघुनाथाच्या खांद्यावर हात ठेऊन त्याच्या कानाशीं लागून म्हणाली, " बाई पाहातील तर सकाळच्या रामप्रहरीं उद्धार होईल आपला. जाऊं द्या तिला आतां परत. झालेली नासधूस पुरे नाहीं का झाली ? "

रघुनाथानें डोळे रोखून सीतेकडे पाहिलें. त्याच्या त्या पाहाण्यांत तूं आपल्या कामाला जा, मी काय तें पाहून घेईन, असा भाव दिसत होता. सीता मुकाट्यानें तेथून निघून गेली. ती गेली नाहीं तोंच रघुनाथाची द्रौपदी वहिनी त्याच्यापुढें येऊन उभी राहिली. तिरस्कार द्वेष, राग यांनीं ती रघुनाथाकडे पाहात होती. तिचा तो अवतार पाहून रघुनाथ उठून उभा राहिला.

द्रौपदीनें कांहीं न बोलतां हातांतील केरसुणी कपिलेच्या पाठींत हाणली. तरीही ती उठली नाहीं. तेव्हां आणखी एक दोन तडाके हाणीत द्रौपदी ओरडली, " ऊठ ! गांवभवानी, ऊठ. तुला घर नाहीं कीं दार नाहीं, म्हणून अशी गांवभर भटकतेस ? खायला मिळत नाहीं तर दगड खा. नाहींतर आम्हांला खा ! "

कपिला नाइलाजानें अखेर उठली. तिनें रघुनाथाकडे केविलवाण्या मुद्रेनें पाहिलें आणि ती चालूं लागली. द्रौपदी तिला सारखी बडवीत होती. तोंडानें तिला आणि रघुनाथाला शिव्यांची लाखोली चालूच होती. कपिला एकसारखी मागें वळून पहात होती.

  

द्रौपदीनें कपिलेला घरीं आणली. परंतु कपिला पान्हा सोडीना. द्रौपदीनें दांडगाई केली, परंतु कपिलेनें दिलेल्या लाथेखेरीज तिला कांहीं मिळालें नाहीं. तेव्हां द्रौपदी चिडली. त्या बांधलेल्या मुक्या प्राण्याला

तिनें यथेच्छ बडविलें. " त्या मेल्याचेंच हें काम ! " ती उद्गारली. " दूध काढून घेतलं असेल ! "

इतक्यांत विश्राम आला. त्याला सारी हकिकत सांगून द्रौपदी म्हणाली, " त्यानंच दूध काढून घेतलं असलं पाहिजे. असं कधीं झालं नव्हतं, आजच ! "

" तुझा हा भलताच तर्क आहे ! रघू असं करणार नाहीं ! "

" आपण भाऊच पडलां. भावाचा कैवार घेणारच. मी सांगतें तें खोटं आणि तो मात्र खरा. खोरं आपल्याकडेच माती ओढणार ! "

" तसं नाहीं म्हणत मी. तुझं म्हणणं खरं आहे, पण रघू सच्चा आहे. त्याला लबाडी, चोरी सहन होत नाहीं. तो कशाला दूध काढून घेणार. तूं कपिलेला मारली असशील, भीतीनं तिनं पान्हा आंवरून घेतला असेल ! "

" कसला पान्हा आवरते ! असं कधीं झालं नाहीं, आजच. त्याच मेल्याचं काम. कसा पडला होता मानेंत मान घालून. वाटण्या झाल्या तरी आहेच इकडे त्याचा डोळा. नजरच वाईट. त्याचीच दृष्ट लागली असेल कपिलेला ! "

त्या दिवशीं द्रौपदीनें रघुनाथाला दूधचोर ठरविलें. आपल्या घंटाळी आवाजांत तिनें ही बातमी जगजाहीर केली. रघुनाथाला ऐकूं जातील अशा शिव्या तिनें घातल्या. सीतेची आणि तिची गांठ विहिरीवर पडायची. सीता दिसली कीं तिला स्फुरण चढे. सीतेनें प्रत्युत्तर केलें नाहीं.

  

सीतेला विहिरीवर जाणें नको असें होऊन गेलें. दुपारीं विहिरीवर फारशी वर्दळ असणार नाहीं, विशेषतः द्रौपदी येणार नाहीं अशी संधी साधून सीता धुणीं धुण्यासाठीं गेली असतां उन्हांत थकून भागून कपिला तेथें आली. तिला तहान लागली आहे, पाणी पाहिजे हें सीतेनें ओळखलें.

आजूबाजूला पाहून द्रौपदी येत नाहीं अशी खात्री करून घेऊन तिनें कपिला गाईसाठीं डोणींत पाणी ओतलें.

कपिला तहानेनें व्याकूळ झाली होती. ती घटाघट पाणी पिऊं लागली. इतक्यांत द्रौपदी पाणी भरण्यासाठीं आली.

कपिला पाणी पीत आहे. जवळच सीता भरलेली कळशी घेऊन तिच्याकडे कौतुकानें पाहात आहे, हें मनोहर दृश्य तिच्या डोळ्यांना सुखकारक वाटलें नाहीं.

द्रौपदीः—सीते, काय चालविलं आहेस तूं हें, कोणाच्या गाईला पाणी पाजतेस.?

सीताः—बाई, कपिला माझी म्हणत नाहीं मी. तहानेनें व्याकूळ होऊन आली म्हणून पाणी पाजलं !

द्रौः—मोठी अहिल्याबाई होळकरीणच लागून गेलीस कीं नाहीं ! खबरदार कपिलेकडे ढुंकून पहाल तर.

सीतेनें कांहीं उत्तर दिलें नाहीं. तिचे डोळे भरून आले.

द्रौ०—पाणी पाजून दूध काढण्याची ही कल्पना आवळा देऊन कोहळा काढण्यासारखीच दिसते.

हुंदका देत सीता म्हणाली, “ बाई, कशाला उगाच आमच्यावर बालंट घेतां ? चोरून दूध काढण्याइतके आम्ही हलकट नाहीं !”

द्रौ०—हलकट नाहीं ? तो रघ्या—तुझा नवरा एक सोडून सात हलकट आहे, समजलीस !

द्रौपदीनें पाहिलें, रघुनाथ उभा राहून आपलें बोलणें ऐकत आहे. क्षणभर का होईना ती दचकली; आणि त्याच्या डोळ्यांतील तो राग, भालप्रदेशावर तट्ट फुगून उडत असलेली शीर, घामाघूम झालेलें अंग आणि एकंदर त्याचा अवतार पाहून तिला भीति वाटल्यावांचून राहिली नाहीं.

“ वहिनी ! ” रघुनाथ रागानें पण शांतपणें म्हणाला, “ पुष्कळ

ऐकून घेतलं. डोक्यावरून पाणी गेलं. आतां जास्त बोलशील तर तोंड फोडून टाकीन समजलीस ! मुळीं गय करणार नाहीं ! "

तोंड फोडीन, हे शब्द ऐकतांच नागिणीच्या शेपटीवर पाय पडला. द्रौपदी पुनः उसळली.

" काय मेल्याचं ध्यान, तोंड फोडणाराचं तोंड पहा ! "

विहिरीवर चाललेल्या भांडणामुळें गांवांतील माणसें आस्ते आस्ते जमा होऊं लागलीं होतीं. विश्रामही आला होता.

तो आला होता तेव्हांच रघुनाथाचें " तोंड फोडीन " हें वाक्य त्याच्या कानांत पडलें होतें. एवढयाशा पोरानें आपल्या बायकोला— वडील भावाच्या बायकोला " तोंड फोडीन " असें म्हणावें याची त्याला मोठी चीड आली.

तो त्वेषानें पुढें झाला. रघुनाथाशीं एक शब्दही तो बोलला नाहीं. मुकाट्यानें त्यानें रघुनाथाच्या उजव्या गालावर एक थप्पड ठेऊन दिली.

त्या बळकट थप्पडीनें रघुनाथ कोलमडून खालीं पडला.

विश्रामानें मागें वळून पाहिलें नाहीं. तो तडक घरीं गेला.

रघुनाथाच्या दांतांतून रक्त येत होतें. सीतेनें सावध करून त्याला घरीं नेलें.

  

शेजाऱ्यापाजाऱ्यांनीं, ' आपण साक्ष देऊं विश्रामावर फिर्याद कर ' असा रघुनाथाला सल्ला दिला. पण तो त्यास पटला नाहीं. फिर्याद करून आपल्या अपमानाची भरपाई होईल असें त्याला वाटेना. त्यानें दुसराच कांहीं निश्चय केला; आणि दांताच्या वेदना जों जों त्याला जास्त होऊं लागल्या तों तों त्याचा निश्चय दृढ होऊं लागला.

त्यानें भावाचा खून करण्याची प्रतिज्ञा केली. त्याची भीषण मुद्रा पाहून सीतेला भीती वाटली.

रघुनाथ संधी शोधीत होता.

भावाच्या तोंडांत मारली याचें विश्रामला आतां वाईट वाटूं लागलें. क्षणिक भावनेच्या भरांत आपण वेडेपणाचें कृत्य केलें असें त्याला वाटूं लागलें. घरीं आल्यापासून तो बेचैन झाला. त्याला कांहीं सुचेना. मुलासारख्या धाकट्या भावाला आपण मारलें—बायकोसाठीं मारलें—आतां आपल्याला लोक काय म्हणतील ? त्यानें एक अविचार केला म्हणून आपणही करावा ? आणि त्यानें अविचार तरी काय केला ? सगळाच दोष आमचा. कपिला त्याची बाळपणापासूनची आवडती. त्याची ताटातूट आपण कां केली ? तो तोंडानेंच बोलला पण आपण हातानें अविचाराची कृति केली.

आईला मरतेसमयीं आपण काय वचन दिलें होतें ? रघुनाथाला दुखवणार नाहीं, त्याला सांभाळून घेईन, त्याला मुलाप्रमाणें वागवीन असें आईला वचन दिलें होतें. त्या वचनाला आतां हरताळ फांसला. वारसाच्या वांटणीच्या ईर्षेला बळी पडून त्या पोराशीं दुष्टाव्यानें वागलों.

विश्रामला झाल्या गोष्टीचा आतां पश्चात्ताप होऊं लागला. त्यानें चौकशी केली तों रघुनाथाचा एक दांत हालत असल्याचें कळून आलें. रघुनाथाची त्याच्या घरीं जाऊन क्षमा मागावी असें त्याला वाटूं लागलें. एक आठवडा तो सारखा निश्चय करीत होता, पण त्याचे पाय उचलत नव्हते.

मनाच्या टोंचणीमुळें अखेर आज रात्रीं त्याला भेटायचें असा विश्रामनें निश्चय केला.

तो आठवडा रघुनाथही कांहीं कमी अस्वस्थ झाला नव्हता. सूडाची भावना लुप्त झाली नव्हती. हालत्या दांताबरोबर ती वाढतच होती. गेला सबंध आठवडा विश्राम घराबाहेर पडलेला त्याला आढळून आला नाहीं. त्यामुळें त्याला सूड उगविण्याची संधी मिळत नव्हती. आतां घरीं गेल्याशिवाय गत्यंतर नाहीं, असा विचार करून आजच्या रात्रीं सूड उगवावयाचा असा त्यानें ठाम निश्चय केला.

  

रात्रीं सर्वत्र सामसूम होती. सीता गाढ झोंपी गेली. तेव्हां रघुनाथ हळूच उठला. त्यानें आपली चिवट ऐनाची काठी हातांत घेतली आणि तो विश्रामाचा समाचार घेण्यासाठीं बाहेर पडला.

इकडे विश्राम गोठयांत गेला. त्यानें कपिलेला दाव्यासह सोडली. आणि दावें हातांत धरून तिला घेऊन तो रघुनाथाच्या समाचाराला चालला.

रघुनाथाची छाती धडधडत होती. त्याचीं पावलें मंद पडत होतीं. तो हळूहळू चालला होता. आपल्या अंगांतलें अवसान आपल्याला सोडून जात आहे असें त्याला वाटूं लागलें. रक्तबंबाळ स्थितींत असलेल्या विश्रामचें चित्र त्याच्या डोळयापुढें उभें राहिलें. त्याचें हृदय चरकलें. त्यानें त्या चित्रांतील विश्रामला हालवून पाहिलें. तो त्याला निर्जीव वाटला. रघुनाथ थांबला. त्याला ती कल्पना सहन होईना. आईची आठवण झाली. तिनें सांगितलें होतें, ' विश्राम सागेल तसें वाग. तोच तुला आतां आमच्या ठिकाणीं आहे— '

—अशा दादाला आपण......

विश्रामचे पाय मात्र झपझप उचलत होते. त्याला अगदीं मोकळें वाटत होतें. त्याला एक प्रकारचा आनंद होत होता.

वाटेंत एक मोठें वडाचें झाड लागलें. तेथें दोघांचीही गांठ पडली. आरंभी ते आपल्याच विचारांत असल्यामुळें त्यांनीं एकमेकांना ओळखलें नाहीं.

आणि ओळखलें तेव्हां दोघेही ओशाळले. रघुनाथाचा हात थरथर कांपूं लागला. ज्याचा सूड उगविण्यास तो जात होता तो प्रत्यक्ष पुढयांत उभा असूनही त्याचा हात चालेना.

दोघेही घामानें चिंब झाले. विश्रामनें बरोबर आणलेल्या कपिलेनें रघुनाथाला चाटण्यास सुरवात केली, तेव्हां तो भानावर आला.

बोलण्याला आरंभ कोणी करावा हेंच त्यांना कळेना. शेवटीं विश्रामनेंच सुरवात केली—

“ कुठें चाललास ? ”

“ सहज— ”

“ मीही सहजच चाललों होतों तिकडे... ”

थोडा वेळ पुनः स्तब्धता उत्पन्न झाली.

“ रघू, ही गाय घेऊन जा तूं. असूं दे तुझ्याकडेच... ” विश्राम म्हणाला.

रघुनाथानें खालीं मान घातली होती. तो कांहींच बोलला नाहीं.

विश्रामला पुष्कळ बोलावयाचें होतें. पण त्याच्यानें बोलवेना. त्यानें कपिलेचें दावें रघुनाथाच्या हातीं दिलें आणि तो मागें परतला.

रघुनाथही कपिलेला घेऊन घरीं परतला.

घरीं जातांना विश्राम विचार करूं लागला. रघुनाथ सहज कुठें जाणार ? तो मलाच भेटायला येत होता—असला पाहिजे. किती झाला तरी माझा भाऊच तो. मी मारलें म्हणून रागावणार नाहीं. अशा प्रेमळ भावाला मी मारलें ! अरेरे ! त्याची क्षमा मागायला पाहिजे होती मी !

रघुनाथाचेही असेच विचार चालले होते. दादा, सहज रात्रीं कुठें जाणार ? झालेल्या चुकीबद्दल क्षमा मागण्यासाठीं तो माझ्याकडे येत होता—असला पाहिजे. मघां त्याच्या डोळ्यांत पाणी नाहीं का आलें ? यानें उपरण्यानें डोळे पुसतांना मीं पाहिलें. आणि मी चांडाळ ! त्याचा सूड उगविण्यास जात होतों. वडील माणसानें तोंडांत मारली म्हणून काय झालें ? अरेरे ! मी त्याची क्षमा कां नाहीं मागितली ?

त्यानें पश्चात्तापानें आपल्या तोंडांत मारून घेतली.

—१९३४

# विहिरीचा संताप



उन्हाळ्याच्या दिवसांत गांवांतील साऱ्या विहीरी आटून गेल्या होत्या. डोळ्यांना लावायलाही पाणी मिळेना. एकटया सावकारांची विहीर त्यांच्या तिजोरी प्रमाणें पाण्यानें भरलेली होती. सारा गांव तेथून पाणी नेऊं लागला. पण त्यांना पाण्यासाठीं किती बोलून घ्यावें लागे!

" उगाच नाहीं इतकें पाणी भरलेलें!" सावकार, लोकांच्या अंगावर खेकसून ओरडत, " पांच हजार पाण्यांत घातले आहेत!"

—आणि असें ते बोलूं लागले म्हणजे लोक पाणी पैशासारखें जपूनच खर्च करीत. त्यांचे हे उद्‌गार आणि गरीब बायांचीं चिमणीं एवढीं तोंडें पाहून विहिरीच्या डोळ्यांतून घळघळां पाणी गळे.

गावांतील महारवाडा चार मैलांवरून पाणी आणी. सावकारांच्या विहिरीवर येण्याचें धाडस त्यांनीं केलें नाहीं.

एके दिवशीं सावकारांच्या वृद्ध मातोश्री विहिरीवर एकटयाच होत्या. दवपूजेसाठीं सोवळयानें पाणी नेण्यासाठीं त्या आल्या होत्या. पाणी काढीत असतां कोणीतरी हांक मारली, " आई—"

त्यांनीं मागें वळून पाहिलें. रखमा महारीण कुठून तरी दमून भागून आली होती.

" काय गो ? " त्यांनीं विचारलें.

" पाणी ! "

" गावांतल्या साऱ्या विहीरी ओस पडल्या का ? इथेंच आलीस ती. जा, मला वेळ नाहीं तुला पाणी द्यायला. कोण घालणार तुला पाणी इथें—? " असें म्हणून त्या पाण्याची कळशी घेऊन हळू हळू निघून गेल्या.

बिचारी रखमा ! गळ्याशीं जीव आला असतांही ती उन्हांतून मार्ग आक्रमूं लागली.

विहिरीला अतीशय वाईट वाटलें. तिच्या अंगाची संतापानें कहाली झाली. संतापानें तिचें पाणी खळाळलें सुद्धां ! ती तळमळूं लागली.

पण त्या महारणीला पाणी देण्याचें तिच्या हातीं थोडेंच होतें !

—१९३५



## सूड

## १२

दुपारची मध्यान्हीची वेळ. रखरखीत उन्हें पडलीं होतीं. उन्हाच्या झुळाटा चोहोंकडे सारख्या हालत होत्या. एका वडाच्या झाडाखालीं रस्त्यालगत एक खटारा गाडी खिन्न अंतःकरणानें रस्त्याकडे पहात होती. जवळच दोन बैल गवत खाऊन रवंथ करीत होते.

गाडीला मागील प्रसंग आठवून वाईट वाटत होतें. ते तिच्या वैभवाचे दिसत होते. दिवसा, रात्रीं, चांदण्यांत शेंकडों मैल फिरावें; बैलांच्या गळ्यांतील घुंगुरांच्या तालावर चाललेलें गाडीवानाचें संगीत ऐकावें, असा क्रम अव्याहत चालू होता.

पण आतां— ?

पहिल्यानेंच एकदां मोटार आली. तिचा वेग आणि चपळाई पाहून गाडी तर स्तिमितच झाली. हळू हळू लोक तिच्यांत बसून जाऊं लागले. गाडीला कोणी विचारीना. एकदां तर मोटारीच्या आवाजाला बैल बुजाले. आणि गाडी बैलांसह खड्ड्यांत जाऊन आदळली. बैल जखमी झाले. गाडी बऱ्याच ठिकाणीं मोडली. नंतर ती दुरुस्त झाली. पण तिच्या हृदयाला झालेली जखम कायम होती.

रस्त्यावरून येतांजातांना मोटार तिच्याकडे पाहून तुच्छतेनें हांसे. गाडी या अपमानामुळें रागानें लाल होऊन राहिली होती. आतांच

पहा. ती अशी खिन्न मनानें पहात असतां ‘ पों पों ’ असा आवाज तिच्या हृदयाला भेदून गेला. मोटार जवळ आली, इतक्यांत—

‘ फाट् ठो ऽऽ ’ असा आवाज ऐकूं आला.

गाडी आश्चर्यानें पाहूं लागली.

मोटारचें चाक फुटून ती पंक्चर झाली होती. उतारू उतरूं लागले. ड्रायव्हर दुरुस्ती करूं लागला.

दीड दोन तास तो इकडे तिकडे करीत होता. पण कांहींच जुळेना. पुरुष त्रासून गेले; बायका उन्हानें सुकून गेल्या; आणि मुलें रडूं लागलीं.

मोटारची ती दुर्दशा पाहून गाडीला समाधान वाटलें. पण मुलांना रडतांना पाहून तिचें हृदय कळवळलें.

सारे प्रयत्न व्यर्थ गेल्यावर ड्रायव्हरानें गाडीवानाकडे मदतीची याचना केली. गाडीवान आला. त्यानें बैलांना गाडीला जुंपलें आणि गाडी रस्त्यावर आणली. मोटार दोरीनें गाडीच्या मागें बांधून जोडली. कांहींजण मोटारींत बसले. कांहींजण गाडींत. मुलें मात्र गाडींतच बसलीं. बैलांच्या गळ्यांतील घुंगुरांच्या आवाजानें तीं आनंदानें नाचूं लागलीं.

गाडी सूडाच्या समाधानानें हळूहळू पुढें चालूं लागली. तिच्यामागून मोटार खालीं मान घालून आवाज न करतां चालत होती !

—१९३५



# सावबा



मार्गशीर्ष महिन्याचे दिवस. थंडी कडाक्याची पडली होती. सारे जीव जंतु गारठून गेले होते. सकाळीं नऊ वाजेपर्यंत दाट धुकें पडलेलें असावयाचें. सावबाच्या झोंपडीवर माडांच्या चुडतांवरून टप्‌टप् दंव पडत होता. जाई जागी होती. तिला त्याचा आवाज ऐकूं येत होता. बाहेर समुद्राच्या लाटांच्या आवाजानें तिला गलबतावरून कोचीनला गेलेल्या सावबाची आठवण झाली. तो गेल्यापासून पहांटे तिला झोंप अशी फारशी येतच नसे. अंथरुणावर पडल्या पडल्या, तो कसा गेला असेल, त्याला भरपूर खायला प्यायला मिळत असेल कीं नाहीं, या थंडीच्या दिवसांत उघड्या समुद्राची गार हवा लागून तो आजारी बिजारी तर पडणार नाहीं, असे त्याच्या विषयींचे हजार प्रश्न ती स्वतःच्या मनाला विचारून उजाडेपर्यंत सारखी विचार करीत पडलेली असावयाची.

आज तर तिचा जीव अगदींच उडून गेल्यासारखें तिला होत होतें. अलीकडे चार पांच वर्षें कोंकणच्या समुद्रावर वेळींअवेळीं वादळें होत. बरसातीचा मोसम संपला तरी अवचित श्रावण महिन्यासारखा पाऊस पडे. आणि व्यापारासाठीं बाहेर पडलेल्या गलबतांची धांदल करी. केव्हां

केव्हां वादळांत सांपडून खलाशी प्राणासही मुकत असत. त्यामुळें सध्यांच्या दिवसांत बाहेर पडणें हें खलाशांना संकटच वाटे. गेले दोन दिवस हवा अगदींच बिघडून गेली होती. गार गार वारे वहात होते. आकाशांत अधून मधून काळे ढग फिरत होते. त्यामुळें, वादळ तर होणार नाहीं ना, अशी कुंशका जाईच्या मनांत येऊन सावबाच्या जीवाविषयीं काळजी वाटून तिचा जीव खालींवर होत होता. आतां सकाळीं उठल्याबरोबर देसायांच्या घरीं जाऊन चौकशी करावयाची असें तिनें ठरविलें. आणि सकाळीं आपला कामधंदा आटपून ती देसायाच्या घरीं जाण्यास बाहेर पडली.

ती बाहेर पडली त्यावेळीं चांगले नऊ–दहा वाजले होते. धुकें हळू हळू विरळ होत होतें, आणि मालवणच्या वेळेवर गाबतांचीं कांहीं मुलें रिकाम्या होड्यांत ठिकठिकाणीं बसून भोपळी घेत होतीं.

जाईनें बाजारासाठीं बरोबर एक लहानशी सरयांची टोपली आणि एक फडका घेतला आणि ती वाट चालूं लागली. तिच्या पायांतील जोडवीं किनाऱ्यावरील मधून मधून दिसणाऱ्या दगडांवर आपटून त्यांचा गोड आवाज येत होता. त्या नादावर, माशांनीं भरलेली टोपली डोक्यावर घेऊन मालवणच्या बाजारांत जाणें तिला फार आवडे. सावबाच्याही तो विशिष्ट आवाज चांगला परिचयाचा असून ती चालणारी जाईच आहे हें तो बिनचूक ओळखीत असे. पण आज जाईचें लक्ष आपल्या जोडव्यांच्या आवाजावर नव्हतें. तिचें सारें लक्ष सावबाकडे—गलबतावर बसून वल्हीं मारणाऱ्या सावबाकडे लागून राहिलें होतें.

आणि या नादांत, पावसाचे थेंब पडूं लागले हें सुद्धां तिला कळलें नाहीं. अंगावर थेंब पडतांच ती दचकून भानावर आली. तिनें पाहिलें कीं, पावसाचीं सारीं चिन्हें दिसत असून कोठेंतरी दूरवर पाऊस पडला असावा किंवा वादळही झालें असावें.

वाटेंत कस्टम मांडवीकडे समुद्रावर वादळाचा बावटा लागल्याचें

तिला कळलें. या बातमीनें तिचा जीव सुकून गेला. काळजीनें अधीर होऊन तिचा ऊर धडधडून खालीं वर होऊं लागला. गलबतवाल्या देसायांच्या घरीं ती आली, त्यावेळीं दादा देसाई कपाळावर हात घेऊन चिंताक्रांत होऊन बसले होते. त्यांच्या दृष्टीपुढें वादळांत सांपडून खड-कावर फुटून तुकडे तुकडे झालेल्या गलबताचें चित्र दिसत होतें.

जाई आली आणि एका खांबाच्या आड उभी राहिली. तिनें भीत भीत दादांच्याकडे नजर टाकली. ती आल्याचें त्यांनीं पाहिलें होतें. पण त्यांनीं एका शब्दानेंही तिची विचारपूस केली नाहीं.

विचारूं कीं न विचारूं अशा स्थितींत जाई बराच वेळ चुळबुळ करीत उभी राहिली होती.

अखेर त्यांच्याकडून कांहींच विचारपूस होईना तेव्हां तिनें विचारलें, " दादा, फत्तेमारीची कांहीं खबरबात ? "

त्यांनीं आपली दृष्टी तिच्याकडे वळविली आणि उलट विचारलें,

" ऊं ? "

" फत्तेमारीची कांहीं बातमी ?...."

" कांहीं नाहीं. या वादळांत..."

" काय ? गलबत फुटू..." तिनें घाबरून विचारलें.

त्यांनीं रागानें तिच्याकडे पाहिलें.

" अगो, पोंचल्याशिवाय कसली खबरबात ? डोंबलाची ! तुझ्या कीं माझ्या ? "

जाईचा जीव खालीं पडला. गलबत सुरक्षित आहे या बातमीनें तिला बरें वाटलें.

" आज तर बावटा लागला..." तिनें हळूच म्हटलें.

" होय. त्याच तर मी काळजींत आहें. अजून कोचीन कांहीं गांठलं नसेल त्यांनीं. आणि वाटेंत वादळांत जर कांहीं आमची ' विजया ' फत्तेमारी सांपडली तर..."

" तर गरीब खलाशांच्या आणि तांडेलांच्या घरांवर आकाशींची कुऱ्हाडच पडेल ! " जाई मध्येंच उद्गारली.

" तर तर ! " दादा रागाऊन म्हणाले, "आणि मी सपशेल धुळीला मिळेन तो ! माझी विजया तर माझें सर्वस्व. तीच बुडाल्यास माझा सत्यनाश झालाच. "

" दादा, तुम्ही मोठीं माणसं. एक विजया गेली तर दुसऱ्या दहा मिळविण्याची आपली हिंमत. पण गेलेले जीव आम्हांला परत मिळतील का ? " जाईच्या डोळ्यांत आसवें आलीं.

दादा तिच्याकडे पहातच राहिले.

" जीव गेले तरी माझ्या काठ्यावर बसून पोटगी मिळवाल आणि खुशाल राजासारखें बसून खाल ! मग त्या जिवांची आठवणसुद्धां होणार नाहीं तुम्हांला. '

" शीः शीः ! काय बोलतां हें, दादा ! लाखाचे जीव जावे आणि खुशाल चैन करावी असं का वाटतं आम्हांला ! "

" हूं ! "

" ते खुशाल घरीं येवोत हेंच देवापाशीं मागणं ! "

यानंतर तिच्याशीं बोलण्याची दादांची इच्छा दिसली नाहीं. ते गप्प बसून राहिले. तेव्हां जाई म्हणाली, " उद्यां येईन पुनः, दादा. कांहीं खबर कळली तर निरोप धाडा, आमचे घरधनी परत येतील असं करा, दादा ! " जाईच्यानें आतां राहावेना. ती रडूं लागली.

" जायल्या, " दादा ओरडले, " जा जा आतां तूं घरीं. उगाच रडून सकाळींच अपशकून नको करूं ! नशीब धड असलं तर येईल तुझा घो परत, जा जा ! "

जाई मुकाट्यानें चालती झाली.

  

वादळ झालें आणि त्यांत देसायांची फत्तेमारी फुटली, खलाशी बुडाले, अशी बातमी आली. हळू हळू गांवांतही ती बातमी पसरली. जाई

दररोज देसायांच्या घरीं जाऊन चौकशी करीत असे, पण बुडालेल्यांपैकीं अजूनही कोणीच परत आलेला नव्हता. आणि कोणाचाही पत्ता लागला नव्हता. तिला वाटे, सावबा जिवंत राहिला असेल; तो असाच केव्हां अवचित् परत येईल आणि आपल्याला भेटेल. तिची वेडी आशा तिला सांगत होती कीं, सावबा खुशाल आहे; या आशेवर ती त्याच्या येण्याची वाट पहात दरवाजावर बसून राहात असे. कधीं कधीं किनाऱ्यावर जाऊन ती तो येत आहे किंवा नाहीं हें दूरवर न्याहाळून पाही. समुद्रांत एकादी होडी फार लांबून येतांना दिसली कीं, त्यांत बसून सावबा येत आहे असें तिला वाटे; आणि ती होडी भलत्या दिशेला जाई किंवा तीमधून भलतींच माणसें उतरत तेव्हां ती निराशेनें वेडी होई.

दुपारीं वेंगुर्ल्यांहून बोट येई, त्या बोटींतून तरी सावबा परत येईल या आशेनें ती दररोज दुपारीं मालवणच्या धक्क्यावर जाऊन राही. पण एक आठवडा झाला तरी सावबाचा पत्ता नव्हता. त्याच्या बरोबरीचे खलाशीही कुठें नाहींसे झाले होते. त्यामुळें तिचें मन द्विधा झालें होतें. कधीं कधीं तिला सावबा आपल्याला या जन्मीं तरी भेटणें शक्य नाहीं असें वाटे. तर कधीं, तो कधीं ना कधीं तरी खास आल्यावांचून राहणार नाहीं असें वाटे.

एके दिवशीं ती अशीच नेहमींप्रमाणें मालवणच्या बाजारांत मासळी विकण्यासाठीं गेली होती. पण तिचें चित्त ठिकाणावर नव्हतें. सावबाचा विरह तिला दुःसह झाला होता. त्याच्या मरणाची कल्पना तिला भेडसावीत होती. तिनें कसेबसे आपले मासे लवकर विकून संपविले आणि उदास मनानें ती घरीं येण्यास परतली. नेहमीं—सावबा असतांना—घरीं जाण्यास तिचे पाय फार उत्सुक असत. घरीं केव्हां आलें याचें तिला स्वतःलाही नवल वाटायचें. पण आतां तिची वाट पहणारें घरीं कोण होतें ?

तिला चालण्याची ताकद उरली नव्हती. हळू हळू ती अर्ध्या वाटेंत आली आणि समोर बरीच गर्दी जमलेली पाहून थांबली. त्या माण-

सांच्या घोळक्याकडे पाहून तिच्या मनांत कल्पना चमकून गेली कीं, त्यांत सावबा तर नसेल ? तो आपल्या सोबत्यांसह आलेला तर नाहीं ?

हा विचार मनांत येतांच ती वाऱ्यासारखी तिकडे धांवली आणि गर्दीत घुसली.

"सावबाची बायको आली !" बरेच जण उद्गारले.

तिनें उत्सुकतेनें, भयभीत होऊन, आंवढा गिळून सभोंवार पाहिलें. पण त्यांत सावबा कुठें दिसला नाहीं. त्याच्याबरोबरचे चार खलाशी आपला जीव बचावून आले होते. पण त्यांत सावबा नव्हता. त्याची काय अवस्था झाली हें समजून घेण्यासाठीं तिनें, तोंड उघडलें, पण तिच्या तोंडूनं शब्दच बाहेर पडेनात. गळा कोणीतरी दाबून धरीत आहे असें तिला वाटलें. तिच्या डोळ्यापुढें अंधारी आली. तिची कंबर खचली; ती कोसळून खालीं पडली.

कोणीतरी तिला तिच्या घरीं आणून पोंचती केली.

  

सावबा समुद्रांत बुडून मेला असाच आतां सर्वांचा समज झाला होता. एक महिन्याचा काळ लोटला होता. या अवधींत तो कुठेंतरी जिवंत असल्यास त्याची कांहीं ना कांहीं तरी खबरबात कळलीच असती. जाईला मात्र त्याच्या मृत्यूची कल्पना सहन होत नव्हती. तो जिवंत असून केव्हां ना केव्हां तरी खास येणार असेंच तिला मनःपूर्वक वाटत होतें. ती तसें बोलूनं दाखवी. या तिच्या विश्वासाबद्दल तिच्यासाठीं सारे हळहळत. तिच्या कोमल मनाला दुःख होऊं नये म्हणून कोणीही तिचें म्हणणें खोडून काढण्याचा प्रयत्न केला नाहीं. उलट तिला सहानुभूतीच दाखविण्यांत येऊन सावबा आल्याशिवाय रहाणार नाहीं असें सांगण्यांत येई.

ती त्याची वाट पहात दारावर, समुद्रावर उभी असलेली नेहमीं दृष्टीस पडत असे.

तो आज येणार म्हणून ती दररोज त्याच्यासाठीं त्याला आवडणारे पदार्थ रांधून ठेवी आणि सारा दिवस वाट पाहून शेवटीं निराशेनें उपाशींच झोंपी जात असे; असा प्रकार कित्येक दिवस चालला होता.

एकदां ऐन मध्यरात्रीच्या सुमारास दारावर थाप बसली आणि " जाई, जाई ! " म्हणून कोणीतरी आपणाला हांका मारीत आहे असा जाईला झोंपेंतच भास झाला.

तिला ती हांक सावबाचीच वाटली. हांकेचा स्वर सावबाचा आहे, हें तिनें ओळखिलें.

ती चमकून उठली. जमिनीवर स्वस्त पडलेलें पान वायूच्या लहरीनें जसें उठतें तशी ती त्या हाकेबरोबर उठली.

आणि पहाते तों सावबा पुढयांत उभा.

त्यानें दिवा केव्हां लावला हें सुद्धां तिला कळलें नाहीं.

आनंदातिशयानें तिचें हृदय भरून आलें. तिनें सावबाला गच्च मिठी मारली आणि ती रडूं लागली.

अशा अवस्थेंत ती कितीतरी वेळ होती. सावबानें तिला खालीं बसविलें. आपणही तिच्या शेजारीं बसला. आणि गलबत फुटण्यापासूनची सारी हकीकत त्यानें तिला सांगितली. सर्व खलाशांची पांगापांग झाली. सावबा वहात वहात एका गांवीं किनाऱ्यावर लागला आणि फिरत फिरत इतक्या दिवसांनीं तो जाईला भेटण्यासाठीं घरीं आला.

जाईला धन्यता वाटली. तो सुखरूप घरीं आल्याबद्दल तिनें देवाचे आभार मानले. आणि थंडीनें तो कांपत होता म्हणून आपलें लुगडें त्याला पांघरायला दिलें.

" भूक लागली असेल, नाहीं ? " जाईनें कळवळून विचारलें.

" होय ! " सावबा पोट दाखवीत म्हणाला, " सव्वा महिना उपाशीं आहे ! "

" काय सव्वा महिना ! " तिनें आश्चर्यानें विचारलें, " अरेरे ! "

" सर्व ठिकाणीं फिरलों पण माझ्याशीं बोलायला कोणीच तयार नाहीं. कोणाकडे याचना केली तर जणुं माझें अस्तित्वच नाहीं अशा आविर्भावानें लोक माझ्याशीं वागूं लागले ! "

" मग मी स्वयंपाक करतें तर ! "

असें म्हणून जाईनें चूल पेटविली. त्याला आवडणारे एक दोन जिन्नस तिनें करायला घेतले. स्वयंपाक चालला असतां त्यांच्या गोष्टी चालल्या होत्या. तो म्हणाला, " काय सांगूं जाई तुला; भुकेनें माझा जीव व्याकूळ झाला होता. पण तुला पाहतांच पोट भरल्यासारखं वाटतंय् मला. तुझी मला घडी घडी आठवण व्हायची ! "

" खरं ? "

" हो, अगदीं खरं. तुझी शपथ ! "

" आणि मी इथं कसे दिवस काढले याची तुम्हांला कांहीं कल्पना तरी ! लोक मला म्हणायचे कीं, तुम्ही हा लोक सोडून गेला—"

" काय, मी मेलों असं वाटलं त्यांना ? " आपल्या मरणाची कल्पना दुःसह वाटून अंगावर शहारे आल्यासारखें करून सावबानें विचारलें.

"—पण माझा त्यांच्या सांगण्यावर विश्वास बसेना. मला आपलं सारखं वाटत होतं कीं, तुम्हीं कधीं तरी असे अवचित् येणार ! "

" अहाहा ! माझ्या जाई, तूं किती किती शाणी आहेस ? "

जाईला ते उद्‌गार सुखकारक वाटले. पण विषय बदलण्याच्या इराद्यानें तिनें म्हटलें, " सांबारं कोणतं करूं ? ताजे मासे मुळींच नाहींत. तुमच्या आवडीची कुबटाची कडी करूं का ? "

" हो, कर ना ! "

सावबाला कुबटाची कडी आवडते हें जाईला ठाऊक होतें म्हणून तिनें ती केली.

तिनें सावबाला वाढलें. तो अधाशासारखा जेवीत होता.

" अमृत, अमृत ! " तो उद्‌गारला. " जाई, किती सुंदर जेवण केलंस हें ? तूंही जरा दोन घांस खा ना ! "

त्यानें आग्रह करून दोन घांस तिला खायला भाग पाडलेंच.

ती आनंदानें फुलून गेली होती.

बाहेर कोण थंडी पडली होती. चुडताच्या झापांतून गार गार वारा येत होता; समुद्राच्या लाटांची भीषण गर्जना ऐकूं येत होती; सर्वत्र अगदीं प्रशांत होतें.

इतक्यांत पहांट होत आली आणि कोंबडा आरवला.

तरीही माई त्याला आग्रह करकरून वाढीत होती. पुनः कोंबडा आरवला. तेव्हां मात्र तो दचकला. आणि घेतलेला घांस हातांत तसाच राहिला.

जाई त्याला वाढण्यासाठीं डवलींतून सार आणि माशांचा एक सुका तुकडा काढून घेत होती.

ती त्याच्या पानावर वाढायला वळली, पण सावबा कुठें होता?

तो संध्याकाळच्या सावलीसारखा पातळ पातळ होत दूर दूर जात आहे असें तिला आढळून आलें.

तिच्या अंगाला दरदरून घाम सुटला. हातांतील डवली खालीं पडली. भीतीनें तिच्या अंगावर कांटा उभा राहिला.

थोड्या वेळानें तिनें उठून दाराकडे पाहिलें. आंतून दाराची कडी जशीच्या तशीच होती. तिला विचार पडला, मग तो आला कसा आणि गेला कसा?

तिनें दार उघडून बाहेर पाहिलें. वारा जोरानें आंत शिरून तिच्या अंगाला झोंबला. बाहेर कापसासारखें दाट धुकें पसरलें होतें. माडाचीं चुडतें सळसळत होतीं आणि दूर अवाळयांत कुत्रीं तुटून पडून सारखीं भुंकत होतीं.

—१९३४

# सुंदर भिकारीण




सौंदर्य हें अमृतासारखें असतें तसेंच तें विषासारखेंही असतें, असा तुळशीला तरी अनुभव येत होता खास. आपलें सौंदर्य हें मानेवरची अक्षय तरवार आहे असें तिला वाटे. सौंदर्यानेंच तिचें आयुष्य संकटांत घातलें होतें. नेहमींप्रमाणें फिरत फिरत ती धोबीतलावावर आली. ठरलेल्या पद्धतीनें तिनें ट्रॅममधील लोकांकडे पैशांची याचना केली. दोघां तिघांनीं एक दोन पैसे टाकले. तिनें ते घेतले आणि वर पाहिलें—

दोन हंसरे मोहक डोळे तिच्याकडे लोभी दृष्टीनें पहात होते. त्यानें आपल्या खिशांतून एक नाणें बाहेर काढलें. तुळशीनें सहजगत्या हात पुढें केला. पण त्याच्या हातांतील रुपयाकडे तिची नजर जातांच तिनें आपला हात मागें घेतला. ती दचकली. तिच्या नकळत तिचें एक पाऊल मागें पडलें. तिला त्या क्षणार्धांत कसलातरी संशय आला म्हणून तिनें त्याच्याकडे निरखून पाहिलें. त्याचे डोळे हंसत आहेत असें तिला दिसलें. घेऊं कीं नको याचा तिला विचार पडला. भिकारणीला आणि एक रुपया ! नकोच—असा विचार करून ती मागें वळणार इतक्यांत फूटपाथवर ठेवलेलें पोर ओरडलें.

त्याच्या ओरडण्यानें जणुं तिला आपल्या स्थितीची जाणीव झाली, कीं आपण भिकारी आहों. तिनें हात पुढें करून तो रुपया घेतला. तो हंसला. त्याच्या त्या हास्यांत सुंदर हिरवळीच्या मागें कृष्णसर्प लपला आहे असा तिला भास झाला.

एक दीर्घ उसासा टाकून ती फूटपाथवर येऊन बसली. त्या एका उसास्यांत कितीतरी अर्थ भरला होता. भूतकाळांतील एक भयानक स्मृति त्यांत दडलेली होती.

तिच्या डोळ्यांपुढें मागील चित्रें दिसूं लागलीं. त्या आठवणीनें तिचा सुंदर चेहरा क्रुद्ध दिसूं लागला. पण क्षणभरच. पुनः असहायतेची दुबळता तिच्या चेहऱ्यावर आली. ती खिन्न दिसूं लागली. कोणतें तरी संकट आपणावर पुढें येणार आहे अशी कल्पना होऊन माणसाची जशी भांबावलेली आणि दीन मुद्रा होते तशीच तिची झाली.

दोन वर्षांपूर्वी कोकणांतील एका खेड्यांतून नवऱ्यानें दारूच्या धुंदींत मारहाण करून तिला घराबाहेर घालवून दिली होती. तिच्या मानी मनाला ती गोष्ट लागून ती घराबाहेर वाट फुटेल तिकडे चालूं लागली. पुनः घरीं परत जावयाचें नाहीं असा तिनें निश्चय केला. भिक्षा मागून पोट भरण्याशिवाय तिला गत्यंतरच उरलें नव्हतें. कशीबशी ती मुंबईला आली. तिच्या लावण्यामुळें साऱ्या पुरुषांचे डोळे तिच्याकडे लागलेले असत. त्या सहस्रनयनांच्या चक्रव्यूहांत तिचा कोंडमारा होई.

एकदां तिच्या निराधार स्थितीचा फायदा घेऊन तिला कोणीतरी फसविलेंच. क्षणिक मोहाला बळी पडून आणखी एका दुबळ्या जीवाच्या पोषणाचा भार तिच्यावर येऊन पडला. स्वतःचें पोट भरण्याची मारामार त्यांत आणखी नवी उपाधी मागें लागलेली. पण त्याला इलाज नव्हता. मुलीला पाठीवर बांधून ती मुंबईच्या रस्त्यावरून सारा दिवस फिरे आणि रात्रीं पोंचे तेथेंच कुठेंतरी रस्त्याच्या बाजूला मुक्काम करी. तेथें कुत्र्यांप्रमाणें माणसांकडूनही तिला त्रास होई. ज्या चुकीमुळें आपलें आयुष्य अधिक त्रासांत गेलें तसा प्रसंग पुनः येऊं नये म्हणून ‘ त्या संकटाला ’ ती भीत असे. आणि तिच्या दुर्दैवानें असे प्रसंग दिवसांतून कितीदांतरी येत. त्यामुळें सुरक्षित राहणें तिला अशक्य झालें होतें. ती पुरुषांची दृष्टी शक्य तों चुकवून बायकांकडे याचना करी. त्यामुळें पोटाला मिळेल इतके पैसे मिळणें अवघड होई. आपल्या सौंदर्याचा उपयोग योग्य रीतीनें केल्यास पैशांच्या राशीवर बसशील, असा उपदेश

तिला केव्हां केव्हां कांहीं व्यक्तींकडून होई पण तिचें मन इतकें तयार झालें नव्हतें. कांहीं झालें तरी शीलाला धक्का लागेल अशी कोणतीही गोष्ट करावयाची नाहीं, असें तिनें ठरविलें होतें. त्या वैभवाचीं सुखद-चित्रे तिच्यापुढें उभीं करण्यांत येत. त्यावेळीं क्षणभर का होईना ही भीक आतां पुरे झाली. त्या प्रकारचें आयुष्य कां घालवूं नये असा तिला विचार पडे. मोह पडे. पण तिचें मन मेलेलें नव्हतें.

घरीं परत जावें असें वाटे. पण आतां तोंड कुठें होतें ? एका बेवारशी मुलाची ती आई झाली होती.

आपल्या तरुणपणींच्या चुकीचें मूर्तिमंत् पाप आपण बरोबर बाळगीत आहें असें त्या मुलीला पाहून तिला वाटे. त्याच्याविषयीं प्रेम वाटण्या-ऐवजीं तिरस्कार मात्र भरपूर वाटे. माणूसकी तिला सोडून गेली असती तर त्याचा खूनही करण्यास तिला दिक्कत वाटली नसती. त्याला सोडून द्यावें असे विचार तिच्या मनांत वारवार येत परंतु अजाण गरीब प्राण्याला अशी अमानुष शिक्षा करणें योग्य होणार नाहीं असें वाटून त्याचा तिला कळवळा येई. पण प्रेम असें त्याच्याबद्दल तिला कधींच वाटलें नाहीं. तिच्या शीलावर दरवडा घालणाऱ्या दरवडेखोराप्रमाणेंच तें मूल कोळशा-प्रमाणें काळें, हिडहिडीत, ओंगळ असें होतें. तिच्या सौंदर्याचा एक कणही त्याच्यांत उतरला नव्हता. तें एक संकट आहे असें तिला वाटे.

पुनः असें संकट आपल्यावर येऊं नये म्हणून ती आपल्यापरीनें जपे. साऱ्या पुरुषांचा तिटकारा करी; पण पोटांत आग पेटली कीं हा सारा तिटकारा त्या आगींत खाक होऊन जाई.

❦ ❦ ❦

आज त्यानें एक रुपया दिला तेव्हां तिचा सारा तिटकारा मुलाच्या ओरडण्यानें कोठल्या कोठें नाहींसा झाला. अगदीं नाइलाजानें तिनें तो रुपया घेतला. तिचें मन तिला खाऊं लागलें. पुनः असें करावयाचें नाहीं असा तिनें निश्चय केला. तो रुपया तिला विषासारखा वाटूं लागला. त्यावर तिची नजर जातांच दोन हंसरे डोळे त्या रुपयांत दिसूं लागले. त्या डोळ्यांची भीति वाटली. त्या भीतीसरशीं तिनें तो रुपया दूर भिरकावून दिला.

सभोंवारच्या लोकांना तिला वेड लागलें आहे कीं काय असें वाटलें. कोणीतरी तो रुपाया घेऊन तिच्याकडे आणून दिला. आपल्या गरीबीची जाणीव होऊन तो रुपया तिनें परत घेतला आणि ती मुलास घेऊन उठली आणि रस्ता चालूं लागली.

पण दररोज दहा वाजण्याच्या सुमारास कुठेंना कुठें तरी वाटेंत, ट्रॅममधून जातांना त्यांची दृष्टिभेट होतच होती. तो तिच्याकडे अशा मोहक रीतीनें पाही कीं तिच्या जिवाचा थरकांप व्हावा. तिच्या मोहक लावण्यानें त्याला पडलेली मोहिनी त्याच्या डोळ्यांवाटे तिला स्पष्ट दिसत होती. तिला पाहिलें कीं, तो हासे आणि खिशांतून एकादें नाणें तिच्या अंगावर फेंकी. असें कितीतरी दिवस चाललें होतें. आतां तर त्यानें तिला पाहून हंसावें, एक नाणें टाकावें, तिनें तें उचलून घ्यावें, त्याच्याकडे पाहून एक उसासा सोडावा असें दर दिवशीं चाललें होतें. त्याच्या डोळ्यांची तिला भीति वाटे, पण त्याला पाहाण्यासाठीं तिचे डोळे प्रत्येक ट्रॅमकडे लागलेले असावयाचे. आणि तो दिसतांच ती दचके, घाबरल्यासारखी होई. त्यानें फेंकलेलें नाणें घेऊं नये असें तिला वाटे. पण तिचे हात नकळत तें उचलून घेत असत.

सर्वांचे डोळे तिच्याकडे लागलेले असावयाचे. त्यामुळें तिला गुदमरल्यासारखें होई. काय करावें ? कोणत्या मार्गानें यांतून आपली सुटका होईल ? असा तिला प्रश्न पडे. पुष्कळ विचार करूनही तिला कांही सुचत नव्हतें. एका भिकारणीला कोण आश्रय देणार ? भिक्षा मागितल्यावांचून आपणांस आतां अन्य मार्ग नाहीं असेंच तिला कळून आलें होतें; भिकारणीला मान अपमान नसतो; तिनें वाटेल त्या अप्रिय गोष्टीही सहन केल्या पाहिजेत; तिनें हात पुढें करावा आणि जें हातावर पडेल तें घ्यावें.

म्हणूनच ती त्या गृहस्थानें टाकलेलें नाणें अव्हेरीत नसे.

  

असा प्रकार नेहमीं चालला होता.

पावसाळ्याचे दिवस होते. ती रस्त्यावरून चालली होती. बाहेर गडद अंधार पडला होता. नुकताच पाऊस पडूं लागला होता. ती भिजून

गेली. मुलीला वस्त्रांत संभाळतां संभाळतां तिला पुरे होत होतें. मूल रडूं लागलें. हळू हळू ती गिरगांवात आली. आतां तर पाऊस जोरानें पडण्यास सुरवात झाली आणि आकाशांत मेघगर्जनाही होऊं लागली.

ती निवाऱ्यासाठीं सभोंवार जागा पाहूं लागली.

एका घराच्या दादराजवळील जागेंत ती येऊन उभी राहिली. तिनें मुलीला खालीं ठेविलें; आणि आपण उबाऱ्यासाठीं हातपाय जवळ आंखडून घेऊन बसली.

इतक्यांत कोणाचीतरी तिला चाहूल लागली. त्या अंधूक प्रकाशांतही तिनें त्या व्यक्तीला ओळखलें. ट्रॅममधून नेहमीं भेटणारा तोच गृहस्थ होता तो.

तिला संकोचल्यासारखें झालें. तिला भीति वाटली. ती चटकन् उठून उभी राहिली. त्यानें कांहींसें वस्त्र आणून तिच्या अंगावर टाकलें.

तिनें त्याच्या डोळयाला डोळा दिला. तिला धडकी भरली. त्याच्या डोळ्यांतील मोहकता तिला सहन झाली नाहीं. एकदम बाहेर पडून निघून जावें असें तिला वाटलें. पण तिचे पाय जागचे हालेनात. जणुं मंत्रमूढ झाल्यासारखी ती तेथेंच खिळून राहिली. तिला देहभान विसरल्यासारखें वाटलें.

त्या उन्मनावस्थेंत त्यानें तिचा हात केव्हां धरला हें तिला कळलें नाहीं.

बाहेर मुसळधारांचा पाऊस पडत होता. मेघगर्जना सारखी होत होती. आणि काळोख सारखा दाट पडला होता. सर्वत्र शांत वातावरण होतें.

तिला कांहींच कळलें नाहीं. स्वप्नांतून जागें झाल्यासारखी ती चमकून उठली. तो बाजूला उभा राहून तिच्याकडे करुणामय दृष्टीनें पहात होता.

तिला स्मृति आली तेव्हां अगदीं खचल्यासारखें झालें. पाय कापूं लागल्यामुळें ती मटकन् खालीं बसली. तिनें निराशेनें कपळावर हात मारून घेतला.

मूल जागें होऊन रडूं लागलें. परंतु तिला त्याचा कळवळा आला नाहीं. त्याच्याकडे उलट ती तिरस्कारानें पाहात राहिली. मध्येंच कांहींसा निश्चय करून ती आवेशानें उठली आणि मागें ढुंकूनही न पहातां भर पावसांतन ती एकटी बाहेर पडली.

—१९३५